

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)




महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १४ वें ] फेब्रुवारी १९६१ [ अंक ५



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.











अनुक्रमणिका



आपण निर्धास्त
राहूं शकतां
ज्या वेळीं
आपण आपला माल..




द्वारा पाठवितां






मध्य रेल्वे

तो तेथें वेळेवर
पोहोंचण्याची आपण
खात्री बाळगुं शकतां








प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष चौदावें
अंक पाचवा

फेब्रुवारी
१९६१

संपादक-मंडळ

आचार्य **स. ज. भागवत**–श्री. **हरि कृष्ण मोहनी**–प्रा. **वि. म. बेडेकर**

प्रा. **गोवर्धन पारीख** का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. **म. शं. साठे** यांनीं **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथें छापून **प्रा. वि. म. बेडेकर** यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

**पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,**
**'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९**

**२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,**
**C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( ज. सातारा )**



[अनुक्रमणिका](#)

## प्राज्ञपाठशालामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४–०–० |
| (२) धर्मकोश– उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६–०–० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५–०–० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०–०–० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५–०–० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६–०–० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) ... | | ५–०–० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६–०–० |
| (९) नवमानवतावाद ... ... ... ... | | २–८–० |
| (१०) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३–०–० |
| (११) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | ३–०–० |
| (१२) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | | २–८–० |
| (१३) छत्रपति संभाजी महाराज ( श्री. वा. सी. बेंद्रे ) .... | | १६–०–० |

# सार-संकलन

## तरणीं मतें

सतत गेलीं १६८ वर्षें प्रकाशित होत आलेल्या 'The Twentieth century' ह्या मासिकानें ऑक्सफर्ड व केंब्रिज विश्वविद्यालयांतील पदवीपूर्व विद्यार्थ्यांना एक प्रश्नपत्रिका पाठवून वेगवेगळ्या विषयांवरील त्यांचीं मतें अजमावण्याचा प्रयत्न केला. नोव्हेंबर १९६० च्या अंकांत ही प्रश्नपत्रिका व कांहीं प्रातिनिधिक उत्तरपत्रिका प्रकाशित झाली आहे.

प्रश्नपत्रिका अशी होती :

(१) शिक्षण संपल्यावर तुम्ही उपजीविकेचें साधन (career) म्हणून कशाची निवड करणार आहांत ? कां ?

(२) उपजीविका निवडण्यांत तुम्ही तिचें नैतिक मूल्य जमेस धरलें आहे काय ?

(३) पांच वर्षांत आपल्याला किती पैसे मिळावेत अशी तुमची समजूत आहे ?

(४) तुम्हांला खरोखर चिंता वाटते अशा आंतरराष्ट्रीय समस्या कोणत्या आहेत ?

(५) इंग्लंडमधील पक्षीय राजकारणाविषयीं तुम्हांला गंभीरपणें कांहीं काळजी वाटते का ?

(६) सक्तीच्या राष्ट्रीय सेवेबद्दल तुम्हांला काय वाटतें ?

(७) इंग्लिश जीवनांत तुम्हांला आवडतें असें काय आहे ? दुसऱ्या स्वरूपाचें जीवन (उदा० रशियन, अमेरिकन, फ्रेंच इत्यादि) तुम्ही अधिक पसंत कराल काय ?

(८) तुमच्या भावना सर्वतोपरी व्यक्त करणारे व तुमच्यावर ज्यांचा सर्वांत जास्त प्रभाव पडला आहे असे आधुनिक लेखक कोणते ?

(९) कपड्यांना तुमच्या जीवनांत काय महत्त्व आहे ? कपड्यांकडे पाहण्याचा तुमचा दृष्टिकोन काय ?

(१०) धर्माविषयीं तुमच्या प्रतिक्रिया काय आहेत ? तुम्ही स्वतःला ख्रिश्चन समजतां काय ? तसें नसेल तर आपण कोण आहोंतसें तुम्हांला वाटतें ?

(११) आईवडिलांबद्दल तुम्हांला काय वाटतें ?

(१२) माणसांत कोणते गुण हवेतच असें तुम्हाला वाटतें ?

(१३) लग्नापूर्वी संभोग करणें तुमच्या मतें चूक कीं बरोबर ? कीं अशा प्रकारें त्याचें मूल्यमापन करतां येणें अशक्य आहेसें तुम्हांला वाटतो ?

(१४) आपल्याला किती मुलें असावीतसें तुम्हांला वाटतें ?

(१५) ह्या प्रश्नपत्रिकेंत न विचारलेल्या कोणत्या प्रश्नाचा अंतर्भाव ह्यांत करावासा तुम्हांला वाटतें ? त्या प्रश्नाचें उत्तर तुम्ही कसें द्याल ?

अंकांत प्रश्नपत्रिकेसोबतच तेरा जणांचीं उत्तरें समाविष्ट केलीं आहेत. उत्तरें देणाऱ्यांचीं वयें १८ ते २३ च्या दरम्यानचीं आहेत. ह्यांत तीन मुली आहेत. सर्व उत्तरें समाजशास्त्रीय दृष्ट्या महत्त्वाचीं आहेत.

पहिल्या दोन प्रश्नांना उत्तर देतांना एका मुलीनें उपजीविकेबद्दल विचारच केलेला नाहीं. दोघींना आवडीनुसार समाजशास्त्रीय संशोधक व शिक्षिकेच्या भूमिका पसंत आहेत. तिघींनींहि उपजीविकेची निवड नैतिक बाजूचा विचार करून केली आहे. तरी एकीनें 'उपासमार होत नाहीं तोपर्यंतच' अशी रेषा दर्शविली आहे. मुलांच्या उत्तरांत स्वतःच्या शिक्षणाचा व उपजीविकेचा संबंध अधिक प्रत्यक्ष दिसून येतो. फक्त एकच जण उपजीविकेची नैतिक बाजू लक्षांत घेण्यास तयार नाहीं. इतरांनीं थोड्याफार फरकानें नैतिक बाजू विचारांत घेतली आहे. अर्थात् 'नैतिक' शब्दाचे रूढार्थ बऱ्याच जणांना मान्य नाहींत. कष्टाच्या मिळकतीचा विचार तिन्ही मुलींनीं कधीं केलेलाच नाहीं. मुलांची अपेक्षा वार्षिक १००० ते २५०० पौंडांपर्यंतची आहे. त्यांतहि नाटककार होण्याची उमेद बाळगणाऱ्या विद्यार्थ्यानें छदामहि न मिळाला तरी बेहत्तर अशी हिंमत दाखविली आहे. एकानें उत्तराऐवजीं नुसतें प्रश्नचिन्ह देऊन ठेवलें आहे.

आंतरराष्ट्रीय समस्यांत सर्वांत महत्त्वाच्या समस्या म्हणजे वर्णविद्वेष, अण्वस्त्रें, रशिया—अमेरिका यांच्या-








तील संबंध, यूनो व चीन, मागसलेल्या देशांतील आर्थिक स्थिति, लोकसंख्येची अवाढव्य वाढ इत्यादि. जागतिक एकराज्याचा उल्लेखहि एकानें केला आहे. या उत्तरातहि अण्वस्त्रांमुळें सर्वनाशाबरोबर आपणहि मरूं ह्या भीतीचा स्वच्छ उल्लेख एकानें केला आहे.

इंग्लंडमधील पक्षीय राजकारणाविषयीं सोयरसुतक नसलेले सातजण आहेत. सक्तीच्या राष्ट्रीय सेवेला म्हणजेच पर्यायानें लष्करी शिक्षणाला पांचजणांचा कडकडून विरोध आहे. एकाचा निव्वळ तात्त्विक विरोध आहे. दोघांचा विरोध नाहीं, पण आपण त्यांतून सुटलों म्हणून त्याला बरें वाटतें.

इंग्लिश जीवनपद्धतींतील विनोदबुद्धि, परंपरानिष्ठा, स्वतंत्रता, common sense, आळशीपणा, बिअर वगैरे अनेक गोष्टी अनेकांच्या आवडत्या आहेत. एकाला फक्त स्वतःची जीवनपद्धतीच तेवढी प्यारी आहे. 'आपल्याला इतरांशीं काय करायचें ?' असा त्याचा सवाल आहे. इस्रायली, अमेरिकन इत्यादी जीवनपद्धती कांहींना जास्त प्रिय आहेत. परंतु दुसऱ्या कोणत्या जीवनपद्धतीचा तसा विशेष परिचय नसल्याची तक्रार बहुतेकांनीं केली आहे. एकजण मात्र इंग्लिश जीवनालाच चिकटून राहण्याचा निर्धार असलेला आहे.

लेसिंग, मर्दो, वेन, वेस्कर, लॉग, ऑस्बोर्न, राईज्मन्, केनेथ बर्क, लॉरेन्स, जेम्स्, ब्रेख्ट्, टॉमस मान, कामू, फॉकनेर, कोएस्लर, प्रूस्त्, नॅबोकोव्ह्, हेन्री मिलर, अल्डस् हक्स्ले, ग्रॅब्रिएल मार्सेल, डिलन टॉमस, जुंग, किंग्जले एमिस, सिमोन् द् बोव्हार, फ्रॉइड, ऑर्वेल, मॅकिनेस, सॅलिंजर, पाउंड, इलियट, जॉइस, अँगस् विल्सन, रेनेसी विल्यम्स, अशीं अनेक नांवें प्रभावी लेखक म्हणून आलीं आहेत. त्यांतहि एका मुलीनें डी. एच्. लॉरेन्सचें नांव आवर्जून सांगितलें आहे.

कपड्यांना सर्वच जण थोड्याफार प्रमाणांत महत्त्व देतात. तरी प्रत्येकाची दृष्टि वेगळी आहे. सामाजिक प्रथांविरुद्ध उभारलेलें बंड म्हणून कुणी कपड्यांकडे बघतात, सुखावह स्पर्श हाहि एक मुद्दा आहे, कपडे म्हणजे एक बुरखा आहे असेंहि एकजण म्हणतो. मुलींपैकीं कुणीच कपड्यांविषयीं इतकी आस्था दाखवलेली नाहीं. एका मुलाला कपडे म्हणजे एक त्रासदायक गोष्ट वाटते. एकाला वाटत, कपडे निव्वळ दुसऱ्याच्या मनावर योग्य ती छाप पाडण्याकरतां उपयोगी पडतात.

दहाव्या प्रश्नाला तीन उत्तरें आपण ख्रिश्चन नसलेल्यांचीं आहेत. अंगाशीं येऊन भिडत नाहीं तोंपर्यंत एकजण सहानुभूति दाखवायला तयार आहे. दोघे रोमन कॅथॉलिक पंथाचे आहेत कांहींना धर्मांत फक्त निष्क्रिय रस आहे. उरलेले नास्तिक आहेत.

आईबापांशीं सर्वतोपरी पटणारे असे फक्त तिघे आहेत. एकजण त्यांना टाळायला पहातो. एकाला त्यांचा त्रास होतो. एकाला आपण त्यांच्यावर अवलंबून आहोंत याचें दुःख होतें. बाकीच्यांचें आईवडिलांशीं कांहीं बाबतींत पटतें, कांहीं बाबतींत पटत नाहीं.

समजूतदारपणा, ध्येयनिष्ठा, दया, प्रामाणिकपणा, बुद्धिनिष्ठा, लैंगिक आकर्षण, निस्वार्थीपणा, नम्रता, नीतिमत्ता, इत्यादि गुण सर्वांना हवेहवेसे वाटतात.

विवाहपूर्व संभोग चुकीचा आहे असें म्हणणारे फक्त तिघे आहेत. बाकीच्यांना बरोबर कीं चूक अशा स्वरूपांत ह्या प्रश्नाचें उत्तर देतां येणें शक्य नाहीं असें वाटतें. इतर अनेक गोष्टी विचारांत घ्यायला हव्यात असें प्रत्येकाचें म्हणणें आहे.

दोन ते पांच मुलांची अपेक्षा साधारणपणें सर्वांना आहे. 'जितकीं होऊं शकतील तितकीं' असें उत्तर फक्त एकाचेंच आहे. मुलांच्या संख्येशीं आर्थिक परिस्थिति निश्चितपणें निगडित झालेली आहे.

विचारले जावेत असे वाटणारे प्रश्न फारच मजेदार आहेत : abstract art चा पुढला मार्ग बंद आहे का; समाजांत वर्गविग्रहाला स्थान आहे का आणि तसें तें असावें का; तुम्ही दिवसांतून किती वेळां आरशांत पहाता; घाणेरडे हाणामारीचे चित्रपट तुम्हांला कां आवडतात; येत्या वीस वर्षांत आपल्या ब्रिटिश जीवनांतील कोणतीं अंगें निश्चितपणें बदलावीतसें तुम्हांला वाटतें; नीतिमूल्यें वस्तुनिष्ठ आहेत काय; शॉपा, रॉबर्ट ग्रेव्हज्, जॉन डॉन वगैरे लोक तुम्हांला कां आवडतात; तुम्हांला सर्वांत जास्त भीति कशाची वाटते; आपण ज्वालामुखीवर बसलों आहोंत ही जाणीव तुम्हांला सतत असते काय; सांप्रतच्या समाजाबद्दल तुम्हांला काय वाटतें; वयाच्या तीस वर्षांपर्यंत जगण्याची तुमची अपेक्षा आहे काय; तुम्ही प्रेमांत पडलां आहांत काय;






आणि शेवटीं, तुम्हांला तीन वर दिले तर तुम्ही काय मागाल ?

; ह्या पहाणींतील सर्व दोष लक्षांत घेऊनहि अशा प्रकारची एखादी पहाणी आपल्याकडील विद्यार्थ्यांतहि व्हावी असें वाटतें.

## रशियाची नवी आघाडी

Institute for the study of U. S. S. R. तर्फे प्रकाशित होणाऱ्या Bulletin च्या ऑक्टोबर १९६० च्या अंकांत रशियाच्या नव्या आर्थिक आघाडीचें खरें स्वरूप स्पष्ट करणारा श्री. स्टीफन सी. स्टोल्ट यांचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील हे उतारे :

" इतर कम्युनिस्ट राष्ट्रांतील उपग्रहांनिशीं न्यूयॉर्कला जाण्याकरतां क्रुश्चोव्ह बाल्टिका बोटीवर चढला, तेव्हांच त्यानें स्वतःची भूमिका निश्चित करून ठेवली होतीः मागासलेल्या देशांचा एकमात्र त्राता ही ती भूमिका. क्रुश्चोव्हच्या ह्या भूमिकेचा अतिशय गंभीरपणें विचार करणें केवळ अशक्य आहे. क्रुश्चोव्ह कांहीं निव्वळ थापा मारत नाहीं, किंवा पूर्वग्रह घेऊन बसलेल्या लोकांत खळबळ माजवणाऱ्या राजकीय पुढाऱ्याचा अभिनय तो करत नाहीं. त्याच्या मागें अतिशय आक्रमक आर्थिक धोरणाचें पाठबळ उभें आहे. अगदीं आतां आत्तांपर्यंत रशियाचें आर्थिक धोरण आर्थिक युद्धाच्या सीमेला येऊन भिडलें होतें. परंतु आतां मात्र हें धोरण म्हणजे प्रत्यक्षतःच आर्थिक युद्ध बनलें आहे. रशियाच्या आर्थिक धोरणाचें हें नवें रूप १९५९ च्या शेवटीं-शेवटीं साकार होऊं लागलें होतें. आणि आतां त्याचीं कांहीं अंगें स्पष्टपणें अभ्यासतां येतात ...

" १९६० सालांत रशियानें वेगवेगळया राष्ट्रांना देऊं केलेल्या कर्जांनीं दोन गोष्टी साधल्या जातात : एक म्हणजे, आर्थिक स्पर्धेत मागासलेल्या देशांच्या वतीनें रशियाला आपले पाय रोंवावयाला नवी जागा मिळते, जुने धागे जुळवून घेतां येतात, यूनोंत नवीं मतें मिळण्याची शक्यता निर्माण होते. परंतु एवढ्याचकरतां इतक्या खटपटी केल्या जात नाहींत. कम्युनिस्ट गटांच्या नेतृत्वाकरतां पेकिंग व क्रेम्लिनमध्यें चाललेल्या स्पर्धेत यामुळें रशियाची बाजू मजबूत होते. उत्तर व्हिएटनामचा दाखला देतां येईल. उत्तर व्हिएटनामला ३५० दश लक्ष रूबल्सचें नवें कर्ज मिळेल, अशी घोषणा ऑगस्टमध्यें केली गेली. त्यानंतर थोडक्याच काळांत, ५ सप्टेंबर रोजीं हॅनॉइ येथें उत्तर व्हिएटनामच्या कामगार पक्षाच्या तिसऱ्या अधिवेशनांत भाषण करतांना हो ची मिन्ह यांनीं शांततामय सहअस्तित्वाच्या समस्येचा उल्लेख करून पेकिंग व मॉस्को यांच्या भांडणांत मॉस्कोची बाजू उचलून धरली.

" पश्चिमी राष्ट्रांविरुद्ध उभारलेल्या ह्या आर्थिक लढ्यांत रशियानें अतिशय जलद गतीनें प्रगति केलेली आहे. क्युबाचेंच उदाहरण घ्या. अमेरिकेहून परतल्याबरोबर लगेच शिखर परिषद मोडण्याकरतां योग्य परिस्थिति निर्माण करण्याच्या मागें क्रुश्चोव्ह लागला. १९६० च्या फेब्रुवारींत हवानांत मिकोयाननें एका आर्थिक करारावर सही केली. ह्या करारामुळें क्युबांत रशियाला एकदम बरेंच वर्चस्व मिळालें. साखर-उत्पादनाच्या बाबतींत क्युबाचा जगांत पहिला नंबर असला तरी क्युबाचें लष्करी महत्त्व त्याहिपेक्षां अधिक आहे. ह्या बेटावरून अमेरिकेच्या पनामा कालव्याला धोका पोंचूं शकतो. हा करार म्हणजे अमेरिकेची खोडी काढण्यासारखेंच होतें. पर्ल हार्बरच्या घटनेनंतर इतकी महत्त्वपूर्ण घटना दुसरी घडली नसेल. अमेरिका व तिचें एखादें मित्रराष्ट्र यांच्यांत असला करार रशियानें कधींच होऊं दिला नसता. मार्शल प्लॅनच्या आरंभीच्या काळांतच सोव्हिएट दृष्टिकोनाचें प्रत्यंतर आलें होतें.

" तेलाच्या धंद्यांतहि फक्त कॅरिबियन भागांतच (वेस्ट-इंडिज् बेटांच्या दक्षिण भागांत) आपलें वर्चस्व वाढविण्याचा रशिया प्रयत्न करत आहे असें नाहीं. १९५८ च्या ऑक्टोबरमध्यें आर्जेंटिनाला रशियाकडून ४०० दशलक्ष रुबल्सचें कर्ज मिळालें, तेलाच्या शुद्धीकरणाच्या यंत्रसामग्रीच्या स्वरूपांत १९५९ सालीं रशियानें बोलिव्हिअन सरकारनें चालविलेल्या तेलधंद्यांत निर्माण झालेल्या अडचणींचा फायदा उठवायचा प्रयत्न केला. Buenos Aires येथील आपल्या वकिलातीमार्फत रशियानें बोलिव्हिअन सरकारला ६० दशलक्ष रुबल्सचें लांब मुदतीचें कर्ज देण्याचा प्रस्ताव मांडला. हा प्रस्ताव धुडकावला गेला. ' आर्थिक स्वायत्तता वाढवण्याकरतां ' भारतालाहि रशियन क्रूड ऑईल







देऊं केलें होतें. १९५९ च्या सेप्टेंबर महिन्यांत झालेल्या भारत–रशिया करारानुसार बारौनी येथें रशिया एक रिफायनरी बांधत आहे. वर्षांतून वीस लक्ष टन तेल तेथें शुद्ध होऊं शकेल. आसाममध्यें रुमानियाहि अशी च एक रिफायनरी उभारत आहे. ब्राझिलमध्यें पाय रोवायला मिळावेत म्हणून सध्यां रशियानें खटपट चालविली आहे. १९६० सालीं ब्राझिलमध्यें कॉफीचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर झालें: प्रत्येकीं साठ किलोग्रॅम्स्च्या ३६ दशलक्ष गासड्या. रशियन नियतकालीकानें अशी टिप्पणी मारली कीं,

'ह्या वर्षी ब्राझिलच्या कॉफी–उत्पादकांना गेल्या वर्षीपेक्षां जास्त आशा वाटत आहे ह्याचें मुख्य कारण असें कीं, गेल्या कित्येक वर्षांत या वर्षी प्रथमच ब्राझिलनें उत्तर अमेरिकेचा मक्ता मोडून टाकला आहे, ब्राझिलियन कॉफीच्या खपाचा नवा मार्ग मोकळा केला आहे.'

"ह्या टिप्पणीनें ब्राझिलसमोर एक नवा मोह झुलत ठेवला. नव्या बाजारपेठेंत नजीकच्या काळांत दरवर्षी वीस दश लक्ष गासड्या कॉफी खपूं शकेल अशी आशा त्यांना वाटूं लागली. आणि ही नवी बाजारपेठ म्हणजेच रशिया ब्राझिलकडून प्रतिवर्षी फक्त तीस लक्ष तीस हजार गासड्या कॉफीच विकत घेत आहे,– म्हणजे सध्यांच्या ब्राझिलच्या उत्पादनाच्या एक टक्क्यापेक्षांहि कमी.

"या आणि अशा प्रकारच्या सर्व हालचाली अमेरिकेला आर्थिक रस असलेल्या प्रदेशांतून तिला हुसकावून लावण्याकरतां मुद्दाम केल्या जात आहेत. कॉंगोंत मात्र सर्वच पश्चिमी राष्ट्रांना हुसकावून लावण्याचा प्रयत्न रशिया करत आहे. आधीपासून अस्तित्वांत असलेल्या सरहद्दी व वंश-गट लक्षांत न घेतां सुमारें शंभर वर्षांपूर्वी आतांचें कॉंगो राष्ट्र युरोपियन वसाहतवाद्यांनीं निर्माण केलें. हें कॉंगो राष्ट्र रेसभरहि फरक न होतां तसेंच रहावें असें रशियाला वाटतें. काटंगा ह्या प्रांताला विभक्त होण्याचा हक्क द्यायलाहि रशिया तयार नाहीं. स्वायत्ततेचा प्रश्नहि विचारांत घेण्याची रशियाची तयारी नाहीं. स्वायत्ततेचा हा नवा रशियन अर्थ म्हणजे त्याच्या आर्थिक लढ्याचा एक अविभाज्य घटक आहे. काटंगावर रशियाचा विशेष डोळा आहे. काटंगानें जर पश्चिमी राष्ट्रांशीं असलेले आर्थिक संबंध तोडून टाकले तर अमेरिकेला गंभीर स्वरूपाचा धक्का बसेल असें रशियाला वाटतें.

"Novoe Vremya मासिकानें लिहिलें आहे :

'काटंगा प्रांताचें क्षेत्रफळ चार लक्ष चौऱ्याऐंशीं हजार चौरस किलोमीटर आहे आणि लोकसंख्या फक्त दहा लक्ष आहे. नैसर्गिक संपत्तीच्या बाबतींत जगांतील कोणताच प्रदेश ह्याची तुलना करूं शकणार नाहीं. भांडवलशाही जगांतील आठ टक्के तांबें, चौदा टक्के जस्त, साठ टक्के औद्योगिक हिरे, पंच्याहत्तर टक्के कोबाल्ट, आणि जवळजवळ शंभर टक्के रेडियम् सध्यां काटंगांत तयार होतें. भांडवलशाही राष्ट्रांत वापरल्या जाणाऱ्या युरेनियमपैकीं साठ टक्के युरेनियमहि आतांपर्यंत काटंगाच्या खाणींतूनच काढलें जात होतें.'

"पहिल्या निवडणुकींत लुमुंबाच्या पक्षाला १३७ पैकीं ४१ मतें म्हणजे तीस टक्के मतें– मिळालीं. त्यांचें सापेक्ष मताधिक्य झालें. आतां मॉस्कोनें जेव्हां या तीस टक्के लोकांची बाजू घेतली तेव्हां तें कांहीं आफ्रिकी लोकांची सार्वभौमता वा त्यांचा स्वयंनिर्णयाचा हक्क ह्यांच्या प्रेरणेनें घडलें नाहीं. प्रेरणा होती काटंगाच्या नैसर्गिक संपत्तीची. खरें म्हणजे रशिया एक खेळ खेळत आहे. ह्या खेळांत पणाला जास्त लावलें गेलेलें नाहीं, पण जीत नाहीं. खूप कांहींसें मिळण्याची शक्यता आहे. सध्यांचा गोंधळ जर चालू राहिला आणि काटंगाच्या खाणींतलें काम जर बंद पडलें तर रशियाचा आपोआप फायदा होतो. जर लोकांची उपासमार झाली तर कम्युनिस्टांचा प्रचार आपोआपच चांगला होईल. आणि रशिया नेहमींच असें सांगूं शकेल कीं, आम्ही तर मदत देऊं केली होती.

"रशियाचें हें आर्थिक आघाडीवरील आक्रमण चीनलाहि मार्गे सारूं शकेल. १९६० च्या एका ऑगस्ट महिन्यांतच रशियानें इराक, भारत, यू. ए. आर., घाना आणि उत्तर व्हिएटनाम या पांच देशांना मिळून एकूण २००९ कोटी रुबल्सची मदत देऊं केली. चीन नक्कीच रशियाशीं स्पर्धा करूं शकणार नाहीं. १३–९–६० रोजीं न्यू चायना वृत्तसंस्थेनें, चीननें गिनीला दहा कोटी रुबल्सचें कर्ज कांहींहि अटी न लादतां व बिनाव्याज दिलें असल्याची घोषणा केली. हें कर्ज व्याज-







रहित आहे, हाच तेवढा महत्त्वाचा मुद्दा आहे. कारण रशिया आपण देऊं केलेल्या कर्जावर अडीच टक्के व्याज आकारतो. कारण चीनहि एक मागासलेलाच देश आहे. क्रुश्चोव्हच्या शांततामय सहअस्तित्वाच्या धोरणाविरुद्ध चीननें उभारलेल्या आघाडीनें रशिया-कडून त्याला अधिक कर्ज मिळण्याची शक्यता होती. परंतु सध्यांच्या कांहीं घटनांवरून असें स्पष्टपणें दिसतें कीं चीनच्या ह्या धमकीनें पैसे उकळण्याच्या मोहि-मेला भीक घालायच्या मनःस्थितींत रशिया नाहीं. कॉमेकॉन ( Comecon ) देशांच्या परराष्ट्रीय व्यापा-राच्या कायम कमिशनच्या ११-६-६० च्या एका पत्रांत, आशियांतील कम्युनिस्ट देशांशीं कॉमेकॉन राज्यें अधिक प्रमाणांत आर्थिक सहकार करतील असें वचन दिलें गेलें होतें. तरीसुद्धां आजपर्यंत रशियाकडून लांब मुदतीचें कर्ज मिळणारा एकमेव आशियाई देश म्हणजे उत्तर व्हिएटनाम. चीन मदतीची भिक्षा मागत आपल्याकडे येईल व मग आपल्याला स्वतःच्या सोयीच्या अटी लादतां येतील, ह्या संधीची वाटच रशिया पहात आहे ही गोष्ट उघड आहे.

"क्रुश्चोव्हनें दोन आघाड्यांवर युद्ध पुकारलें आहे : तात्त्विक आणि आर्थिक. आणि दोन्ही ठिकाणीं त्याचें धोरण चढाईचें आहे. अमेरिका व तिचीं दोस्तराष्ट्रें यांविरुद्ध यशस्वी आर्थिक युद्ध खेळण्याची रशियाची परिस्थिति आहे किंवा काय हा एक प्रश्न आहे. उत्पा-दनांच्या तुलनेनें विशेष कांहींच निष्पन्न होत नाहीं. कर्जापेक्षां आपल्या कच्च्या मालाला बाजारपेठ मिळ-विण्यांत मागासलेल्या राष्ट्रांना जास्ती उत्साह आहे. कच्च्या मालाच्या बदल्यात आपल्याला यंत्रसामग्री मिळावी व त्यायोगें आपल्या शेतीचें आधुनिकीकरण करावें अशी त्यांची मनीषा आहे. या उलट आपलें सारें नक्षत्रमंडळ व आपण स्वतः परदेशी कच्च्या मालाच्या तावडींतून सुटावें, याकरतां रशियाचे प्रयत्न चालू आहेत. ह्या दिशेनें जसजशी अधिकाधिक प्रगति होत जाईल, तसतशी मागासलेल्या राष्ट्रांना कम्युनिस्ट बाजारपेठ बंद होत जाईल. इतर देशांच्या औद्योगीकरणालाहि रशिया फारशी मदत करूं शकत नाहीं. १९५० सालीं यंत्रसामग्रीच्या निर्यातीचें प्रमाण एकूण निर्यातीच्या ११·८ टक्के होतें. तर १९५८ सालीं ते अवघें १४·९ टक्के होतें. ह्या दोन्ही वर्षांतील यंत्र-सामग्री व औद्योगिक सामग्रीच्या निर्यातीचें प्रमाणहि अनुक्रमें २१·६ व २३·९ टक्के होतें. आर्थिक वर्चस्व मिळवण्याचा सर्वोत्कृष्ट उपाय म्हणजे परराष्ट्रीय व्यापार. कांहीं क्षेत्रांत फ्रान्स, इंग्लंड आणि पश्चिम जर्मनी यांच्या एकूण उत्पादनापेक्षांहि आपण अधिक उत्पादन करतों, अशी बढाई रशियन नेते मारत असतात. परंतु वास्तविक तुलना करून पाहिल्यास, ह्यांतील कोणत्याहि एका देशाच्या निर्यातीच्या जवळपास रशिया पोंच-ण्याची शक्यताहि फार कमी आहेसें दिसतें. १९५८ सालीं रशियानें एकूण ४२९८ दशलक्ष डॉलर्स किंम-तीच्या मालाची निर्यात केली. हेच आंकडे इतर देशांच्या बाबतींत असे आहेत : फ्रान्स- ५११२ दश-लक्ष डॉलर्स, पश्चिम जर्मनी- ८८०८ दशलक्ष डॉलर्स, आणि इंग्लंड- ९३९५ दशलक्ष डॉलर्स. इतकेंच काय पण १९५८ सालीं तीन Benelux राज्यांनींहि ६२६४ दशलक्ष डॉलर्स किंमतीचा माल निर्यात केला आहे.

" सारांश क्रुश्चोव्हच्या आर्थिक चढाईला पुरेसें पाठबळ लाभलेलें नाहीं. चढाईची पद्धत हा ह्या चढाई-तील सर्वांत मोठा धोका आहे. पूर्वीप्रमाणें निव्वळ बाजारपेठा व कच्चा माल शोधण्याकरतां रशियानें हें आर्थिक युद्ध पुकारलेलें नाहीं. आपलें लष्करी व राज-कीय वर्चस्व पसरवण्याकरतां आर्थिक साधनांनीं पुकार-लेलें हें प्रत्यक्ष धुमश्चक्रीचें युद्धच आहे. ह्याचे परिणा-महि अतिशय आश्चर्यकारक आहेत. कांगोंतील गोंध-ळाची किंमत रशियाला फारशी पडत नाहीं. कबूल केलेल्या अन्नधान्याचा व वाहनसामग्रीचा फक्त कांहीं अंशच आत्तापर्यंत रशियानें कांगोला पोंचता केलेला आहे. आणि क्युबा ! १०० दशलक्ष डॉलर्सचें कर्ज देऊनहि रशिया क्युबाकडून नेहमींच्या जागतिक बाजारपेठेच्या दरानेंच- पौंडास सव्वातीन सेंटस् दरानें-साखर खरेदी करत आहे. म्हणजे १९६० सालीं १७ लक्ष टनांकरतां ११० दशलक्ष डॉलर्स आणि नंतर दहा लक्ष टनांकरतां ६५ दशलक्ष डॉलर्स. अमेरिका पौंडास साडेपांच सेंटस् देऊन क्युबाकडून साखर घेत होती. भविष्यकालीन झगडे तात्त्विक आदर्श आणि आर्थिक क्षेत्रांतील असतील. आर्थिक युद्ध आणि लोकांना भडकावणें या गोष्टी त्या मानानें खूपच स्वस्त आहेत आणि शिवाय त्या अण्वस्त्रांइतक्या धोक्याच्याहि नाहींत. "










## जपानी राजकारणाचीं डावीं-उजवीं टोकें

इंग्लंडच्या Royal Institute of International Affairs तर्फे प्रकाशित होणाऱ्या The World Today ह्या नियतकालिकाच्या नोव्हेंबर १९६० च्या अंकांत श्री. इव्हान मॉरिस यांचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे :

"दोन अवतरणांनींच मला सुरुवात करूं दे.

"प्रथमतः, 'शांतता, लोकशाही आणि मानवतावाद यांवर श्रद्धा ठेवणाऱ्या, देशबांधवांबद्दल अभिमान बाळगणाऱ्या आणि राष्ट्रीय प्रेमावर आधारलेल्या शिक्षणाकरतां आम्ही झटूं. आपल्या पूर्वजांच्या ह्या भूमी व दोन हजार वर्षांच्या जुन्या इतिहासाबद्दल आपल्याला वाटणाऱ्या निष्ठेला आपण चिकटून राहिलें पाहिजे.' आणि दुसरें, 'जपानी राष्ट्राची स्वतंत्र सार्वभौमता पुन: प्रस्थापित करणें व संपूर्णतः निःपक्षपाती, गटबाजीपासून सदैव मुक्त अशा जपानची स्थापना करणें हें आमचें ध्येय आहे. आशियाई जनतेशीं एकजूट बांधून आम्ही वसाहतवादापासून अखेरची सुटका करून घेण्यासाठीं झटूं. उदात्त, शांततामय व क्रांतिकारी चळवळीच्या साहाय्यानें आम्ही जपानमध्यें वर्गहीन समाज उभारण्याचें कार्य करूं. नियोजित अर्थव्यवस्थेनें आम्ही जनतेच्या उपजीविकेला स्थैर्य आणून देऊं.'

"ह्या दोन्ही उद्धृतींचा उगम एकाच ठिकाणाहून झाला आहे, हें बहुसंख्य वाचकांना मान्य होईल. आतां सांगतों : पहिली उद्धृति जपानच्या कम्युनिस्ट पक्षाचे सध्यांचे सेक्रेटरी जनरल श्री. नोझाका यांच्या एका भाषणांतील आहे. दुसरी उद्धृति युद्धोत्तर काळांत शेकडोंनीं संघटित झालेल्या अति उजव्या अशा संघटनांपैकीं जपान Revolutionary Chrysanthemum- Flag Comrade's Association नें काढलेल्या जाहिरनाम्यांतील आहे.

अशीं सदृश उदाहरणें डझनावारी आढळतील, परंतु ह्या दोन उद्धृतींनींहि एवढें पुरेशा प्रमाणांत सिद्ध होतें कीं निदान कांहीं बाबतींत तरी जपानी राजकारणांतील डावीं-उजवीं दोन्ही टोकें एकमेकाच्या बरींच जवळ येतात. जपानच्या पुढें उभ्या ठाकलेल्या प्रमुख समस्यांच्या समाधानाचे दोघांचेहि उपाय खूपसे सारखे आहेत. दोन्ही पक्ष जोरदार राष्ट्रीय वृत्तीचें प्रदर्शन करतात आणि वारवार 'शांतता' ह्या शब्दांचा जप करूनहि आपलीं राष्ट्रीय उद्दिष्टें बळाचा वापर करून साध्य करण्याचा निर्धार त्यांच्यांत आहे. ते जरी वारंवार लोकशाही घोषणांचा वापर करत असले तरी, त्यांची भूमिका व मार्ग सर्वथा लोकशाही, लोकसभाधिष्ठित राज्यपद्धति व पाश्चिमात्य उदारमतवादी आदर्श यांना विरोधी अशी आहे. दोन्ही पक्ष परकीय सत्तांशीं नमतें घेण्याबद्दल, उच्चपदस्थांच्या लांचलुचपतीबद्दल व अधिकारारूढ पक्षाच्या पुढाऱ्यांच्या व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेबद्दल सरकारवर कडकडून हल्ले चढवत असतात. त्यांचे हे हल्ले निव्वळ शब्दांपुरते मर्यादित न राहतां हिंसक कृत्यांचें रूपहि घेतात. अति-उजव्यांबद्दल बोलायचें तर एकच डोळ्यांत भरण्याजोगें उदाहरण पुरेसें होईल : १२ ऑक्टोबर १९६० रोजीं झालेला समाजवादी नेते श्री. असानुमा यांचा खून. येथें आणखी पूर्वीचे प्रधानमंत्री श्री योशिदा यांच्या खुनाचे नाना प्रयत्न व सध्याचे प्रधानमंत्री श्री. किशी यांजवरील हल्ला यांचीहि आठवण व्हावी. डाव्यांचीं असलीं कृत्यें शोधण्याकरतां आपल्याला जास्ती मागें जावें लागणार नाहीं : जपान-अमेरिका संरक्षण कराराच्या पुनरुज्जीवनाच्या वेळीं हजारों निदर्शक पोलिसांशीं झुंजून लोकसभेच्या आवारांत घुसले होते, ही घटना अगदीं ताजी आहे.

दुसरें असें कीं एकाच प्रकारच्या व्यक्तित्वाचीं माणसें या दोन्ही विरोधी पक्षांकडे सारखींच आकर्षित होतात. इंग्रजी हुकुमशाहीवादी व कम्युनिस्टांबाबत लिहितांना डॉ. आयसेंक ( Eysenck ) यांनीं अशा व्यक्तित्वाच्या माणसांना tough-minded म्हटलें आहे (पहा: Psychology of Politics, Routkdge and Kegan Paul, 1954 ). चढाई, वर्चस्व, आत्यंतिकता, कर्मठता, असहिष्णुता, संकुचित मनोवृत्ति आणि शब्दप्रामाण्य हे ह्या tough - minded व्यक्तित्वाचे कांहीं विशेष आहेत. हे सर्व गुणविशेष जपानी कम्युनिस्ट, छुपे कम्युनिस्ट आणि अति-उजव्या गटांचे सभासद ह्या दोघांचेहि विशेष गुणधर्मच आहेत.

नुकत्याच जपान-अमेरिका संरक्षण कराराच्या वेळीं टोकियोंत झालेल्या निदर्शनाच्या वेळीं अनेक निरीक्ष-

कांनीं निदर्शन आयोजित करणाऱ्या डाव्या गटाच्या विद्यार्थी-नेत्यांच्या व्यक्तित्वाची व मनोवृत्तीची तुलना १९३० ते ४० ह्या दशकांत Imperial Way Faction चे अधिकारी असलेल्या व फेब्रुवारी १९३६ मध्यें झालेल्या भयंकर रक्तपाताला जबाबदार असलेल्या लोकांच्या मनोवृत्तीशीं व व्यक्तित्वाशीं केली आहे. त्या वेळच्या तरुण अधिकाऱ्यांप्रमाणेंच हे कडवे विद्यार्थीहि शेतकरी कुटुंबांतले, भांडवलशाहीबद्दल व जैसे-थे स्थितीबद्दल ज्वलंत द्वेष बाळगणारे होते. दोन्ही बाबतींत हीं कडवीं तरुण माणसें सरकारी लांचलुचपतीबद्दल व पाश्चिमात्य राष्ट्रांशी वागतांना सरकारनें अधिक स्वतंत्र वृत्ति न दाखवल्याबद्दल धुमसत होते. दोन्ही खेपेला त्यांच्या ह्या धुमसणाऱ्या विरोधानें अगतिक मोकाट हिंसेचें व पारंपरिक सामुदाईक आचरणाची आठवण करून देणारें रूप धारण केलें होतें. हें सादृश्य शेवटपर्यंत ताणत नेतां येणार नाहीं. पण तरी ही उपमा अत्यंत महत्त्वाची आहे. दोन्ही टोकाच्या उजव्या व डाव्या माणसांच्या व्यक्तित्वांतील सादृश्याची कल्पना बळकट पुराव्यानेंहि सिद्ध होऊं शकते. अतिशय सहजतेनें हीं माणसें आपला पक्ष बदलूं शकतात. ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत स्थानबदल करूं शकतात. ( उदाहरणादाखल तानाका सीगेन, नाबेयामा सादाचिका, अकमस्तुम कत्सुमारो, मितामुरा शिरो, असहारा कॆझो, ताजिमा योशियुकी, काझामा जोकिची, ओयामा इवाओ, सानो मनाबु यांचीं नांवें देतां येतील. ) जपानी कम्युनिस्ट पक्षाचा एखादा माजी सभासद मध्यमपंथी समाजवादी गटापेक्षां क्रांतिकारक उजव्या संघटनेंत अधिक सहजपणें वावरूं शकतो.

आणखी एक, दोन्ही जपानी टोकें एकाच वातावरणांत पोसलीं जात आहेत. लोकसभेसारख्या संस्था व लोकशाही यांवरील अविश्वासामुळें दोघांचाहि फायदा होत आहे, आध्यात्मिक पोकळींत दोघेंहि यशस्वीरीत्या आपलें बळ वाढवत आहेत, आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी कीं लष्करी वा आर्थिक आणिबाणीच्या क्षणींच फक्त त्यांच्या हातांत वास्तविक सत्ता येण्याची शक्यता आहे.

यावरून एक गोष्ट प्रथमतः ध्यानांत ठेवली पाहिजे; ती ही कीं जपानमधलीं दोन्ही राजकीय टोकें प्रथमदर्शनीं वाटतात त्यापेक्षां खूपच सदृश आहेत. एका टोकाला कम्युनिस्ट पक्ष व दुसऱ्या टोकाला उजवी राष्ट्रीय चळवळ अशा सरळ रेषेनें जपानी राजकीय चित्र काढतां येणार नाहीं. जपानची राजकीय सद्यःस्थिति म्हणजे एक वर्तुळ आहे. त्याचीं दोन टोकें कोणत्याहि मध्यमपंथी राजकीय गटापेक्षां परस्परांना अधिक जवळचीं आहेत. किंवा त्सुकुइ नांवाच्या एका प्रख्यात उजव्या फळीच्या विचारवंतानें सांगितल्याप्रमाणें ' जपानमधील डावे आणि उजवे यांच्यांत फक्त एका कागदाच्या जाडीइतकें अंतर आहे. '

परंतु तरीसुद्धां युद्धपूर्व काळाप्रमाणेंच आतांहि जपानमध्यें कडवे डावे आणि कडवे उजवे हे एकमेकांचे कट्टर शत्रू आहेत. कधींकधीं तसे ते एकमेकांना साहाय्यभूत होत असले, तरी मुद्दाम होऊन राजकीय सत्ताकेंद्राला विरोध करण्याकरितां ते एकत्र येण्याची शक्यता नाहींच. आर्थिकदृष्ट्या आणीबाणीची परिस्थिति येऊन जर परराष्ट्रीय व्यापारांत भयंकर घट झाली, बेकारी आत्यंतिक प्रमाणांत वाढली, जीवनमान एकदम खालीं घसरलें आणि त्यामुळें सध्यांची लोकशाही रचना कोसळली तर आतां अजिबात शक्य नसलेल्या एखाद्या मार्गानें कडवे उजवे किंवा कडवे डावे आपलें वर्चस्व प्रस्थापित करतील. लोकशाही संस्थांचा व पुढाऱ्यांचें पतन, त्यामुळें निर्माण झालेलें भ्रमनिरसनाचें व खळबळीचें वातावरण आणि अगतिक प्रश्न सोडविण्याकरतां हिंसात्मक उपाय योजण्याकरतां असलेली स्वतःची तत्परता, — या सर्वांचा ते फायदा उठवतील. राजकीय कणा मोडत आहे, आणि पाश्चिमात्य लोकशाही पद्धतीबद्दल संपूर्ण अविश्वासी बनवलेलीं माणसें एकदां ह्या टोकाला तर एकदां त्या टोकाला असे गोते खात असतांना दोन्ही पक्ष आपापलें बळ वाढवतील. परंतु शक्यता अशी आहे कीं विशेष वेळ न जातां नंतर लगेचच कडव्या डाव्या वा कडव्या उजव्या नेतृत्वाखालीं एक सर्वंकष सत्ताधारी सरकार उभें राहील आणि प्रतिपक्षाला चिरडून नामशेष करणें हें त्याचें पहिलें कार्य असेल.

आतां आपल्यापुढें प्रश्न उभा ठाकतो तो असा कीं राजकीय मेरुदंडाच्या भयंकर दुबळेपणामुळें सर्वांत जास्त फायदा कोणाचा होईल : डाव्यांचा कीं उजव्यांचा ? ह्या विषयीं जपानमध्यें बरेंच कांहीं लिहिलें-बोललें गेलें आहे. येथें फक्त थोडके महत्त्वाचे मुद्देच तेवढे



अनुक्रमणिका







मांडतां येणें शक्य आहे. ही समस्याच मुळीं अतर्क्य गोष्टींनीं भरलेली आहे. कारण लोकशाही केंद्रबिंदूचें खच्चीकरण व दोन टोकांचें बळसंघटन कोणत्या परिस्थितींत व कसें होतें, यावर खूपसें अवलंबून आहे. तसेंच जगांत इतरत्र त्यावेळीं कशी परिस्थिति आहे, यावरहि बदलाचा भर असेलच. परंतु तरी जपान्यांच्या व आपल्याहि दृष्टीनें हा प्रश्न अतिशय महत्त्वाचा आहे. म्हणून त्यावर थोडे तर्क करावयालाहि हरकत नाहीं. आणि असें करतां–करतां जपानबद्दल व लोकशाही तंत्राला अद्याप स्थैर्य न लाभलेल्या इतरहि देशांबद्दल कांहीं उपयुक्त मुद्दे आपल्या हातीं लागण्याची शक्यता आहे.

सरळ आंकड्यांच्या बळाची तुलना केली तर फारसें निष्पन्न होणार नाहीं. इतर देशांतहि कम्युनिस्ट पक्षाला सत्ताधिष्ठित होण्याला आंकड्यांनीं फारशी मदत केली असल्याचें दिसून येत नाहीं. आणि शिवाय सध्यांची जपानी कम्युनिस्टांची दुबळी आंकडेवारी पाहून शांतपणें झोंपीं जाणें मूर्खपणाचें ठरेल. जनतेचा पाठिंबा मिळविण्याकरतां विशेष न झटणाऱ्या जपानी कडव्या उजव्यांबाबतहि हें खरें आहे. परंतु तरी थोडीशी सहाय्यभूत ठरूं शकणारी आंकडेवारी अशी : कम्युनिस्ट पक्षाचे अंदाजें एक लक्षावर सभासद आहेत. त्यांतील निम्मे सभासद देशांतल्या सहा मोठ्या शहरांचे नागरिक आहेत. १९५८ सालच्या लोकसभेच्या निवडणुकींत कम्युनिस्टांना दहा लक्षापेक्षां थोडीं जास्त मतें मिळालीं होतीं ( एकंदर मतांच्या २.६ टक्के ) आणि कम्युनिस्ट पक्षाचा एक उमेदवार निवडून आला होता.

आतां कडवे उजवे इथें एकाच सुसंघटित व शिस्तबद्ध पक्षाऐवजीं शेकडोंवारी परंपरानुग व व्यक्तिप्रधान गट आहेत. १९५६ सालीं पोलीसांच्या यादीप्रमाणें जवळजवळ एक हजार उजव्या संघटना अस्तित्वांत होत्या. त्यांची एकूण संख्या जवळपास कम्युनिस्टांइतकीच म्हणजे सुमारें एक लक्ष होती. ह्या हजारापैकीं नव्वद संघटना 'महत्त्वाच्या' आहेत असें म्हटलें होतें. ह्या नव्वदांतल्या पन्नास युद्धपूर्व काळापासून अस्तित्वांत होत्या आणि चाळीस मात्र नव्या होत्या. माझ्या स्वतःच्या अंदाजाप्रमाणें उजव्या गटांची एकूण सभासद संख्या ऐंशी ते नव्वद हजारापर्यंत असेल. निवडणुकीच्या वेळीं उजवे उमेदवार एक फळी उभारत नाहींत. आणि कडव्या उजव्या फळीचे प्रतिनिधि म्हणून त्यांना ओळखतां येत असलें तरी सामान्यतः ते Liberal–Democratic पक्षाचे अधिकृत उमेदवार म्हणून उभे राहतात. हा Liberal–Democratic पक्ष पुराणमतवादी योशिदापासून ते उच्छृंखल कट्टर राष्ट्रीय वृत्तीच्या शिदो काझुमा यांना सामावून घेण्याइतका अघळपघळ आहे. १९५८ च्या निवडणुकींत ह्या कडव्या उजव्यांना एकूण सुमारें आठ लक्ष साठ हजार मतें मिळालीं ( एकूण मतांच्या २.३ टक्के ) आणि नऊ उमेदवार निवडून आले.

तेव्हां निव्वळ आंकडेवारीवरून पाहातां ह्या दोन टोकांत निवड करायला फारशी मोकळीक नाहीं. त्यांच्या गर्भित शक्तीचा विचार करतांना आणीबाणीच्या क्षणीं जेव्हां प्रचलित राज्यव्यवस्था समोर उभ्या ठाकलेल्या समस्येला तोंड द्यायला असमर्थ ठरली असेल तेव्हां ह्या दोन्ही पक्षांना सत्ता काबीज करायला जे घटक साहाय्यभूत ठरतील, ते अतिशय महत्त्वाचे आहेत.

कम्युनिस्टांना उघड उघड कांहीं फायदे आहेत. उजव्या गटांपेक्षां ते अनंत पटींनीं अधिक संघटित आहेत. आणि उजव्यांना सतत विस्कळीत ठेवणाऱ्या व्यक्तिप्राधान्याचा बोज त्यांच्याजवळ नाहीं. उजवे गट सतत प्रत्येक प्रश्नाबाबत वेगवेगळीं उत्तरें सुचवत असतात आणि म्हणून कधींच कशाच बाबतींत एक फळी उभारूं शकत नाहींत; या उलट कम्युनिस्टांची प्रत्येक प्रमुख प्रश्नाबाबतची ठाम दिशा ठरलेली असते ( अर्थात् ही दिशा मॉस्को वा पेकिंग येथून येणाऱ्या आदेशानुसार वारंवार बदलत असते ही गोष्ट वेगळी ). संथ गतीनें वाढणारें जीवनमान बेकारीचा आणि आणीबाणीच्या वेळीं विशेषेंकरून दिसून येतील अशा आर्थिक अन्यायांचा कायम नायनाट असें भवितव्याचें एक भरीव चित्र कम्युनिस्ट सादर करूं शकतात. आणि शिवाय युद्धाला– अण्वस्त्रांना– पुनर्लष्करीकरणाला असलेल्या लोकांच्या विरोधाचा जास्तीतजास्त फायदा कम्युनिस्टच घेऊं शकतात. शिवाय जपानमधील अमेरिकेचे तळ व ओकिनावाचें भवितव्य वगैरेसारख्या महत्त्वाच्या बाबतींत उजव्यांपेक्षां कम्युनिस्टच लोकांच्या राष्ट्रीय वृत्तीचा फायदा उठवूं शकतात. आणि उजव्या संघटना एका प्रकारच्या पोकळींत असतांना कम्युनिस्टांचे मित्र मात्र समाजवादी पक्षाचे कांहीं

अंश, कामगारसंघटना, विद्यार्थीचळवळ, शिक्षक-संघटना व बुद्धिमान् लोक यांच्यांत विखुरलेले आहेत.

परंतु ह्या सगळ्या गोष्टी लक्षांत घेऊनहि मला असें वाटतें कीं ज्यावेळीं जपानमधील सध्यांची लोकशाही राज्यपद्धति कसळून पडेल त्यावेळीं जपान कम्युनिझमपेक्षां कोणत्यातरी कडव्या उजव्या राजकीय प्रणालीकडे झुकण्याची शक्यताच अधिक आहे. ह्या माझ्या विश्वासाला अनेक गोष्टी कारणीभूत आहेत. पहिली गोष्ट अशी कीं राष्ट्रीयवादाचें स्वरूप युद्धपूर्वकाळानंतर आतांपर्यंत कितीहि बदललें असलें तरी अजून सबंध जपानला एका सूत्रांत बांधूं शकणारी ती एकच गोष्ट आहे. आणि बदललेल्या स्वरूपांतल्या आजच्या राष्ट्रीयवादाला डाव्यांपेक्षां उजवी फळी कितीतरी अधिक जवळची आहे. अमेरिकाविरोधी प्रचारावर भर देऊन राष्ट्रीय वृत्ति पेटवण्याचे खूप प्रयत्न जरी डाव्या फळीनें केले असले तरी बहुसंख्य जनतेकडून त्यांच्या ह्या आरडाओरडीला साद मिळालेली नाहीं. आणीबाणीच्या परिस्थितींत जेव्हां एक गट म्हणून सबंध राष्ट्र अराष्ट्रीय प्रतीकें धुंडाळून तीं नष्ट करून टाकत असेल तेव्हां परत एकदां कम्युनिस्टांनीं आपल्या हातानें आपल्या पायावर धोंडा पाडून घेतल्याचें सिद्ध होईल. उलट, उजवे लोक जपानी राष्ट्रीय वृत्तीचे सर्वोत्कृष्ट प्रतिनिधि आहेत. पश्चिमेशीं घनिष्ट संबंध ठेवल्याबद्दल conservatives वर राष्ट्रीयवाद्यांकडून हल्ला होत असतो, आणि कडव्या डाव्यांची सांगड लोकांच्या मनांत रशिया व लाल चीनबरोबर केव्हाच घातली गेली आहे. या उलट अमेरिकेशीं तात्पुरते चांगले संबंध ठेवायला हवेंत ही आवश्यकता बऱ्याच अंशीं मान्य करून कडवे उजवे कोणत्याच देशाशीं वा परकीय घडामोडींशीं संलग्न नाहींत. शिवाय लोकशाही पद्धति व कम्युनिझम दोन्ही परकींच वाटतात, परंतु परत संपूर्णपणें पौर्वात्य असणाऱ्या राजपद्धतीकडे आणि सनातन राष्ट्रीय परंपरेकडे जाण्याची हांक देणारी उजवी फळी शंभर टक्के जपानी आहे.

हें आणखी एका मुद्याशीं संलग्न झालेलें आहे. हा दुसरा मुद्दा असा कीं कम्युनिस्टांपेक्षां कडवे उजवे सामान्यतः सबंध जपानी परंपरेशीं अधिक समस्वर झालेले आहेत. जवळजवळ प्रत्येकच बाबतींत डाव्यांपेक्षां ते जपानी वातावरणांत फिट्ट बसतात. हें वातावरण अर्थात् दुसऱ्या महायुद्धाच्या आधींपासूनच खूप बदललें आहे. पूर्वी कधींहि नव्हता इतका मोकळेपणा आणि स्वातंत्र्य आज जपानी समाजांत आलेलें आहे. परंतु इतकें पश्चिमीकरण व लोकशाहीकरण होऊनहि जपान निश्चितपणें जपानीच राहिला आहे. सर्व दृष्टींनीं : सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक. उजवे गट आणि त्यांचे नेते लोकांच्या सांस्कृतिक सुरक्षितता व क्रमविकासाच्या इच्छेला आवाहन करूं शकतात. अशा रीतीनें आवाहन करणें कम्युनिस्टांना केवळ अशक्य आहे. कारण ते जरी राष्ट्राच्या सांस्कृतिक परंपरेबद्दल कितीहि गप्पा मारत असले तरी सामान्यतः लोकांना ते परके व मूर्तिभंजकच वाटतात. आधुनिक काळाच्या पूर्वी असलेली परिस्थिति व भावना जपानमध्यें अजुनीहि सर्वत्र व खोलवर पसरलेली असल्यानें उजव्यांनीं परंपरागत मार्गांत दिलेली जवळीक हा त्यांच्या गर्भित शक्तीचा मोठाच ठेवा आहे.

उजव्यांनीं परंपरेला केलेलें हें आवाहन विशेषतः ग्रामीण भागांत व प्रांताच्या पातळीवरहि बरोबर लागूं पडतें. यावरून मला एक तिसरा मुद्दा सुचतो : परंपरेबद्दल भयंकर प्रेम बाळगणारे, शहरांबद्दल खोल रुजलेला द्वेष बाळगणारे व परकीय नव्या गोष्टींबद्दल संशयग्रस्त असलेले शेतकरी व इतर ग्रामीण लोक आणीबाणीच्या काळांत डाव्यांच्या आंतरराष्ट्रीय सिद्धांतापेक्षां उजव्यांच्या सुधारणेच्या कल्पनेला बळी पडण्याची शक्यताच अधिक आहे. युद्धोत्तर काळांत ग्रामीण भागांत व परगण्यांत कडव्या डाव्यांचें बळ दुर्लक्ष करण्याइतकें दुबळें रहावें आणि ह्याच विभागांतून उजव्या उमेदवारांना निवडणुकींत भरघोस यश मिळावें ही गोष्ट अतिशय महत्त्वपूर्ण आहे. आर्थिक गंडांतर आलें कीं जमीनसुधारणेच्या काळापासून अत्यंत प्रगतिविरोधी व स्थितिशील राहिलेल्या ग्रामीण समाजाच्या या गुणांनाच धोका पोंचेल. त्यामुळें ह्या शेतकी अडचणींच्या मुळावरच घाव घालूं शकणाऱ्या व त्यांतून वाट काढण्याचें अभिवचन देणाऱ्या कोणत्याहि गटाला एक संधि मिळेल. परंतु तरीसुद्धां अशा वेळी कम्युनिस्टांपेक्षांहि आर्थिक सुधारणेची सांगड राजेशाहीकडे व जपानीपणाकडे पुनर्गमनाशीं घालणाऱ्या उजव्या गटांनाच जीत करून घेण्याची संधि अधिक मिळणार आहे.








अतिशय नाट्यपूर्ण रीत्या जपानचें औद्योगीकरण झालें असलें तरी शेतकरी प्रजा अजून त्रेचाळीस टक्के भरते आणि धंद्याच्या दृष्टया हाच एक सर्वांत मोठा गट जपानमध्यें आहे. शेतकऱ्यांच्या राजकीय वृत्तीबद्दल नुकत्याच केलेल्या निरीक्षणांत प्रा. डोर यांनीं ऐक्य आणि सुसंगतिसारख्या व्यक्तिविरोधीं मूल्यांवर त्यांचा अजून खूपच विश्वास असल्याचें नमूद केलें आहे. (R. P. Dore: Land Reform in Japan, Oxford University Press, 1959) ह्यामुळें आणीबाणीच्या वेळीं ते सार्वतांत्रिक सिद्धांताला सहज पाठिंबा देऊं शकतील. त्यांनीं प्रश्न विचारलेल्या शेतकऱ्यांपैकीं पन्नास टक्क्यांपेक्षा जास्त जणांना अजून असें वाटतें कीं राज्यपद्धतींत कधींच खंड न पडलेला हा देश खरोखरच 'देवांचा देश' आहे. ऐशीं टक्के शेतकऱ्यांना असें वाटतें कीं जपाननें आशियाचें नेतृत्व करावें. शाळेंतील मुलांच्यांत राष्ट्रीयवृत्ति बाणवण्यासाठीं आणखी प्रयत्न व्हायला हवेत असेंहि त्यांना वाटत असल्याची नोंद प्रा. डोर यांनीं केली आहे.

सध्यांची पद्धत हतबल झाल्यावर देशांतील बलशाली पुराणमतवादी लोकांचें पारडेंहि जवळजवळ निश्चितपणें कम्युनिस्टांपेक्षां उजव्यांकडेच झुकेल. सध्यांच्या normal परिस्थितींत स्थितिशील राजकारणी, नोकरदार आणि व्यापाऱ्यांनीं सध्यांच्या सरकारला पाठिंबा द्यावा ह्यांत वावगें कांहींच नाहीं. परंतु निवड करण्याचा पेंच जर त्यांच्यासमोर पडला तर कमी वाईट म्हणून ते कोणत्या टोकाची निवड करतील ही गोष्ट प्रायः संशयातीत आहे. भयानक आर्थिक गडातराच्या बरोबरच कामगारांत अशांतता वगैरे सामाजिक ताण दिसूं लागतील त्याच बरोबर ट्रेड युनिअन्समध्यें आणि इतरत्रहि कट्टर डाव्यांचें वर्चस्व जलद गतीनें वाढेल. आणि अशावेळीं जर आतांच्या लोकसभाधिष्ठित मार्गानें सरकारला ही समस्या सोडवतां येणें अशक्य आहे असें दिसून आलें तर अनेक व्यापारी-पुढाऱ्यांना उजव्या गटांना व त्यांच्या धोरणाला निदान अर्धाकच्चा पाठिंबा तरी द्यावा असें वाटूं लागेल. कम्युनिझमच्या सर्वनाशाविरुद्ध १९३३ च्या पूर्वीच्या नाझीवादाप्रमाणें हेंच एकमेव सर्वोत्कृष्ट संरक्षण आहे असें त्यांना वाटणें शक्य आहे. सत्तारूढ पक्ष आणि कम्युनिस्ट यांच्यामध्यें भरून काढतां न येण्याजोगें अंतर आहे. आणि या उलट कडव्या उजव्या फळीच्या कित्येक व्यक्तींचे सत्तारूढ पक्षाशीं घनिष्ट संबंध आहेत; एवढेंच नव्हें तर १९५३ सालापासून लोकसभेचे सभासद म्हणून निवडून आलेले उजव्या फळीचे लोक जवळजवळ नेहमींच सत्तारूढ पक्षाचे अधिकृत उमेदवार म्हणून निवडणूक लढविणारे होते.

शीतयुध्दानें ग्रासलेल्या जगांतील जपानची वास्तविक परिस्थितिहि जपानला कम्युनिस्टांपेक्षां उजव्यांकडे झुकणें भाग करेल. जोंपर्यंत आंतरराष्ट्रीय ताण कायम राहतील आणि जपानमध्यें कॉंझरर्वेटिव्ह् सरकार अधिकारपदावर राहील, तोपर्यंत जपानच्या आर्थिक व लष्करी दोन्ही क्षेत्रांत अमेरिकेचें बरेचसें वर्चस्व राहण्याची शक्यता आहे. अमेरिका आणि इतर सर्वच पश्चिमी राष्ट्रें जपान आपली लोकशाही पद्धति टिकवून धरेल अशी आशा बाळगून आहेत. आणि जपान जर दोन टोकांमध्यें झुलत राहिलें तर तें कोणत्या टोकावर स्थिर होण्यानें पश्चिमेला अधिक धोका आहे, हें अगदीं उघड आहे आणि अशा वेळीं विशेषतः अमेरिका हें टाळण्याकरतां आपलें वजन कॉंझरव्हेटिव्हांच्या बाजूनें खर्च करेल हेंहि तितकेंच उघड आहे. पण जपान जर उजवीकडे झुकलें तर मात्र अशी कांहीं प्रतिक्रिया होईल कीं नाहीं याबद्दल जबरदस्त शंका आहे. कम्युनिस्ट देश अर्थातच ओरड करतील. परंतु जपानच्या धोरणावरील त्यांचा साक्षेपतः अल्प प्रभाव पाहतां उघडउघड ह्या प्रकरणांत हात न घालतां विशेष कांहीं ते करूं शकतील असें दिसत नाहीं. पण जर कम्युनिष्ट राष्ट्रें मध्यें पडलींच तर मग सध्यांच्या परस्परसंबंधांच्या परिस्थितींत युध्दाला तोंड लागणें शक्य आहे. आणि मग जपान्यांच्या दृष्टीनें हा देश कोणीकडे झुकतो हा प्रश्न अगदीं क्षुल्लक बनेल.

जपानसारख्या परंपराप्रिय देशांत उजव्यांना आणखी एक फायदा आहे. तो असा कीं त्यांच्या हातीं सत्ता येण्याकरतां सध्यांच्या राजकीय सत्तेच्या रचनेंत जमीन-अस्मानाचे घडाकेबाज बदल घडण्याची आवश्यकता तेवढी नाहीं. मात्र हेंच पारडें डावीकडे ढळलें तर अंतर्गत आणि आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतहि सध्यांचें सगळेंच एकदम संपूर्णतः बदलेल. एरवीं उजव्यांनें सत्ताग्रहण सध्यांच्या पध्दतीचीं संस्थात्मक सर्व अंगें शाबूत ठेवून व

राज्यकारभारांत आणि इतरत्रहि, तसेंच एकपक्षीयता व सत्तावादी कारकीर्द यांच्यांतहि एक प्रकारची सांखळी ठेवून राष्ट्र उजवीकडे ढळूं शकेल.

ह्या समस्येंत अतर्क्याला खूपच वाव आहे आणि कोणतेच ठांशीव निष्कर्ष काढण्याची मोकळीक आपल्याला नाहीं. जपान इतर कोणत्याहि देशापेक्षां बाहेरच्या जगांतील घटनाप्रवाहावर कांकणभर अधिक अवलंबून आहे. पाश्चिमात्य देश व कम्युनिस्ट देश यांच्या दरम्यान चाललेल्या बळस्पर्धेंत जर कम्युनिस्टांचें बळ अकल्पित जलद गतीनें वाढलें तर मग जपानचें भवितव्य ठरवतांना मघां सांगितलेले सर्वच मुद्दे एकदम रद्बादल ठरतील. पश्चिमेशीं असलेलीं जपानचीं व्यापारविषयक नातीं जर बिघडलीं आणि कम्युनिस्टांनीं जर त्यामुळें होणाऱ्या परिणामांचा फायदा उठवला तरी फलित हेंच निघेल. शेवटीं फक्त एवढेंच सूचित करतां येणें शक्य आहे कीं, जपान डावीकडे झुकेल कीं काय व कम्युनिस्ट गटांत सामील होईल कीं काय, ह्या प्रश्नाचा विचार करतांना आणीबाणीच्या काळांत जपानला उजवीकडे ओढून नेण्याची शक्यता असलेल्या गोष्टींकडे आपण दुर्लक्ष करूं नये. आरंभींच पाहिल्याप्रमाणें हीं दोन्ही टोकें पुष्कळ बाबतींत परस्परांशीं समानता राखून आहेत व एकाच वातावरणांत वाढत आहेत. संभाव्य धोक्यांची जाणीव जर आपल्याला असेल तर मग रोग थांबवण्याची ताकद वा तयारी आपल्यांत नसली तरी आपण त्याचीं लक्षणें ओळखूं शकूं.

---

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# प्रशान्त आश्रमांतील तपस्विनीची हत्त्या

दिनांक १५ ला सकाळीं ९ वाजतां एलन रॉय यांचा वध झाला, ही वार्ता आली. ही वार्ता ऐकून माझ्या डोळ्यांसमोर अंधेरी आली. शोकाविष्ट झालों. तो केवळ शोक नव्हता; शोकापेक्षां दाहक अशा भावनेनें हृदय भरून गेलें होतें. दुःख, करुणा, उद्वेग, निराशा व अगतिकता या भावनांचा तो क्षोभ होता. हा क्षोभ मला हालाहलासारखा स्तब्धपणें धारण करावा लागला. कारण त्या दिवशीं माझ्याकडे अभ्यागतांची गर्दी झाली होती. ता. १३ डिसेंबरला माझे गुरु केवलानंद स्वामी यांच्या स्मारकमंदिराचा उद्घाटन समारंभ राष्ट्रपतींच्या हस्ते झाला. त्यानंतर त्या मंदिराच्या वास्तुशांतीचा उत्सव दोन दिवस चालू होता. त्या करितां शेकडों अभ्यागत आले होते. त्यांना माझी दीनवाणी स्थिति उमगली. त्यांनीं त्यानंतर माझ्यापासून औपचारिक शिष्टाचाराची अपेक्षा केली नाहीं. जन्मभर विरक्त व संन्यासी राहून दुःखसागर म्हणून करुणेनें व औदासीन्यपूर्णवृत्तीनें विश्वाकडे पाहणाऱ्या संन्यासी गुरूंच्या समाधिस्थानाच्या स्मारकाचा हा उत्सव होता. संन्यासी दृष्टीला दिसणारा मानवीजीवनाचा अर्थच ह्या वार्तेच्या रूपानें मला धक्का देऊन माझ्या समोर प्रत्यक्ष उभा राहिला! कोणतीहि महत्त्वाची घटना पाहिली किंवा ऐकली कीं विचारांत मग्न होण्याचा माझा स्वभाव आहे. ही वार्ता ऐकल्यानंतर माझे विचारच खुंटले. ज्या परिस्थितींत तिचा वध झाला ती परिस्थिति एका शांत आश्रमाची परिस्थिति होती. आणि हा शांत आश्रम म्हणजे एका आंतरराष्ट्रीय थोर क्रांतिकारकाचें निवासस्थान आहे.

## एम्. एन्. रॉय यांची तपश्चर्या

एम्. एन्. रॉय यांनीं स्वतःचें घर वयाच्या चौदाव्या वर्षी भारताच्या स्वातंत्र्याच्या लढ्यांत भाग घेण्याकरितां सोडलें. ते एलनशीं विवाहबद्ध होईपर्यंत बेघर होते. जिप्सीसारखे विश्वक्रांतीच्या ध्यासांत ते विश्वभर भटकत होते. कोणत्याच देशांत ते स्थिरपणें टिकूं शकले नाहींत. ब्रिटीश साम्राज्यशाहीचा ससेमिरा त्यांच्या पाठीशीं पंचवीस वर्षे होता. एम्. एन्. रॉय भारतांत म्हणजे मायदेशीं आल्यावर देखील गुप्त परंतु नीडरपणेंच संचार करीत होते. वयाच्या चौदा वर्षांपासून ५० वर्षांपर्यंत त्यांना कोठेंहि स्वतःची विश्वासाची जागा लाभली नाहीं. वादळांपाठीमागून वादळें म्हणजे क्रांतीचीं वादळें उठत होतीं; व ते त्यांत सामील होत होते. अशा वादळीं जीवनांत राहूनहि ते तत्त्वचिंतकाच्या भूमिकेंतून विश्वाचा, समाजाचा आणि राजकारणाचा अभ्यास व अध्ययन करीत होते. जेव्हां ते भारताच्या कारागृहांत सहा वर्षे बंदिस्त झाले तेव्हां त्यांच्या अध्ययनाला व ज्ञानमय तपाला अधिक साफल्य येऊं लागलें. १९३६ च्या अखेरीस त्यांची भारताच्या कारागृहांतून मुक्तता झाली. ही वार्ता एलनला युरोपमध्यें कळली. एलनचें आणि रॉय यांचें मीलन युरोपांतच जर्मनींत १९२७ च्या सुमारास झालें होतें.

## प्रेम व ध्येय

एलन मोठी भाग्यशाली होती. एम् एन्. रॉय यांच्यामध्यें तिला अगाध प्रेमाची आणि विश्वक्रांतीच्या ध्येयवादाची सफलता लाभली. ती विदुषी होती. तिला जर्मन, फ्रेंच व इंग्लिश भाषेवर प्रभुत्व लाभलें होतें. जर्मन कम्युनिस्ट पक्षाच्या कार्यवाहींत उच्चपदावरून अनेक वर्षे ती भाग घेत होती. तिनें जर्मन भाषेंत फ्रेझरच्या ' गोल्डन बाऊ ' म्हणजे ' सुवर्णशाखा 'या मानववजातिशास्त्रावरील महाग्रंथाचा हजारों पृष्ठांचा पहिल्या तारुण्याच्या उमेदींतच अनुवाद केला आहे. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट आंदोलनामध्यें विविध भाषांत अनुवाद करण्याची कामगिरी मोठ्या कुशलतेनें तिनें बजावलेली आहे. इंग्लिशप्रमाणेंच जर्मन व फ्रेंच भाषांमध्यें सहज लीलेनें उच्च दर्जाचें राजकीय, सामाजिक व तात्त्विक विषयांवर निबंधलेखन तिनें केलें आहे. ' पेझंटस् इंटरनॅशनल–' ( शेतकरी आंतरराष्ट्रीय संस्था ) ची चिटणीस व त्या संस्थेची संपादिका म्हणून तिनें












अनेक वर्षें कामें केलीं आहेत. एम्. एन्. रॉय हे तिला भेटल्यावर त्यांच्या बुद्धिमत्तेची व क्रांतिकारक धीरगंभीर अशा सुंदर व्यक्तिमत्त्वाची छाप तिच्या मनावर पडली. एका क्रांतीच्या आगींतून दुसऱ्या क्रांतीच्या आगींत निधड्या छातीनें शिरून काम करीत असलेला असा चिंतनशील योगीच तिला भेटला, असें तिला वाटलें. या योगिनीचें हृदय आपोआप त्यांच्या ठायीं समर्पित झालें.

सांसारिक योगक्षेमाची कसलीहि तरतूद ज्या पुरुषापाशीं नाहीं दुपारची भाकरी कशी मिळवावी व उद्याचा योगक्षेम कसा चालेल याचा विचार जो करीत नाहीं, अशा पुरुषाला आत्मसमर्पण करणारी अशी विदुषी क्वचितच सांपडेल.

### केवळ दर्शनाची उत्कट इच्छा

एम्. एन्. रॉय कारागृहांतून सुटले ही वार्ता कळल्याबरोबर त्यांच्या दर्शनाची अनेक वर्षें उत्कंठेनें प्रतीक्षा करीत युरोपमध्यें आंतरराष्ट्रीय क्रांतीच्या आंदोलनांत भाग घेत असलेली एलन भारताकडे येण्यास उद्युक्त झाली. तिनें 'मी भेटीस येत आहे' म्हणून रॉय यांना कळविलें. रॉय यांनी उलटटपालीं तिला लिहिलें कीं, 'कशाला येतेस ? युरोपमध्यें काय वाईट आहे. तेथील प्रगत संस्कृतीच्या वातावरणांत तुझ्या कर्तबगारीच्या विस्ताराला फार वाव आहे. कशाला इकडे येतेस ?' एलननें लिहिलें, 'केवळ दर्शनाकरिता व केवळ भेटीकरितां येत आहे, राहावत नाहीं, म्हणून येत आहे. बोटी हिंदुस्थानच्या किनाऱ्याला लागतात व परत जातात. परत येणाऱ्या बोटीनें परतहि येईन. पण एकदां डोळे भरून दर्शन घेऊं द्या.'

एलन एम्. एन्. रॉय यांना भेटली. येथील मित्रांना एलनचें चमकदार व्यक्तिमत्त्व पाहून ही रॉय यांची सहधर्मचारिणी म्हणून शोभेल, असें एकदम वाटलें. येथील मित्रांनी रॉय यांना आग्रहाचा सल्ला दिला कीं अशी जोडीदारीण तुमच्या उतारवयांत तुम्हांला मिळणें आवश्यक आहे. तिच्याशींच विवाहबद्ध झालांत तर तुमच्या कर्तृत्वाला अधिष्ठान लाभेल.

### विचारसृष्टीला अनमोल देणगी

रॉय यांचें मन वज्रासारखें दृढ होतें. बुद्धिमत्ता हिमालयासारखी विशाल होती. विचार अत्यंत प्रगल्भ होते. परंतु त्यांचें शरीर पोखरलें गेलें होतें. एलनशीं विवाहबद्ध झाल्यानंतर रॉय जवळजवळ पधरा वर्षें जगले. एलन लाभली नसती तर रॉय यांच्या पंधरा वर्षांच्या विचारमयतपस्येचा मानवतावादरूपी अमर निष्कर्ष प्राप्त झाला नसता. दोनचार वर्षांतच त्यांच्या प्रकृतीनें त्यांना दगा दिला असता. एलननें रॉय यांचा मातृवत् सांभाळ केला. त्यांची सर्वप्रकारची सेवा अहोरात्र दक्ष राहून शेवटच्या क्षणापर्यंत तिनें केली. त्यांच्या जीवनाचा प्रत्येक क्षण तिला अलौकिक मोलाचा वाटत होता. त्यांच्या प्रत्येक श्वासाला नवसाला पावलेल्या देवाप्रमाणें ती महत्त्व देत होती. त्यांनी खाजगी चर्चेंत, सामुदायिक चर्चेंत व सार्वजनिक सभेमध्यें जीं जीं भाषणें केलीं, तीं सर्व तिनें सोन्याचे कण समजून आपल्या अत्यंत वेगवान्, अशा लघुलेखन पद्धतीनें लिहून घेतलीं. त्यांच्या बोलण्याचा प्रत्येक क्षण तिनें लेखनिविष्ट केला आहे. एलननें इंग्लिशमध्यें नवमानवतावादाच्या तात्त्विक भूमिकेवर 'मॅन इन हिज ओन इमेज' ('मानवाचा आदर्श') हा ग्रन्थ लिहिला आहे त्यावरून तिच्या तत्त्वदर्शी प्रज्ञेची व विचारगांभीर्याची साक्ष पटते.

### रमणीय आश्रमाची निर्मिति

एलनमुळेंच त्यांना घर मिळालें. डेहराडून येथील १३ मोहिनीरोड येथील रॉय यांचा आश्रम हा एलननें निर्माण केला. तेथें एक लहानसें घर व दीड एकर पडीक जमीन होती. मसुरी या हिमालयांतील पर्वतशिखराचा परिसर येथून दिसतो. चार महिने किंवा तीन महिने हिमाच्छादित होणारीं चमकदार शिखरें येथून दृष्टीचें आकर्षण करीत असतात. पडिक जमिनीला सुंदर उपवनाचा आकार एलननें दिला. विविध प्रकारची सर्व ऋतूंत फुलणारी व डोलणारी फुलांची बाग तिनें निर्माण केली. भारतांतील उद्यानविशारदांना मोहित करणारें वैचित्र्यसंपन्न असें हें उद्यान आहे. नुसते जास्वंदीचेच २२ प्रकार या उद्यानांत मी स्वतः मोजून काढले आहेत. तेथेंच राहत्या कुटीच्या डाव्या बाजूला पूर्वाभिमुख व कुटीकडे पाठ असलेलें पुस्तकालय व उच्च विद्यालयीन चार विद्यार्थ्यांना योग्य अशी नवी अभ्यासिका येथें बांधली आहे.

या आश्रमांत एम्. एन्. रॉय यांनीं रेनासन्स इंस्टिट्यूटची सन १९४६ साली स्थापना केली. हा आश्रम











गेलीं २२ वर्षे भारतांतील नवमानवतावादी आंदोलनाचें केंद्र बनला. येथें भारतीय व आंतरराष्ट्रीय सहस्रावधि अभ्यागत आजपर्यंत भेट देऊन व राहून गेले आहेत. या आश्रमांतील १॥ एकरांतील प्रत्येक वृक्ष, फुलझाड, फळझाड, झुडुप व वल्ली एलनच्या स्निग्ध दृष्टीनें व हळुवार हातानें जोपासली गेली आहे. या उद्यानांतील वृक्षवल्लींनीं स्वतःच्या प्रफुल्लित शोभेनें व रॉयपति-पत्नींनी प्रसन्न स्मित मुद्रेनें अभ्यागतांचें व मित्रांचें निरन्तर स्वागत केलें आहे. रॉयपतिपत्नी दोघेहि उत्तम पाकविशारद व चोखंदळ; दोघेहि चुलाणांत इंधन घालण्यापासून पाकसिद्धीपर्यंतचीं कामें बरोबरीनें करीत. त्यांच्या उदार आतिथ्यानें उद्यानांतील वृक्ष-वेलींचा तजेला अभ्यागतांच्याहि चेहऱ्यांवर खुलूं लागे. आश्रमाची पृष्ठभूमि म्हणजे ध्यानमग्न दिसणाऱ्या हिमालयाच्या उत्तुंग रांगाचा परिसर! एरवीं नित्य चिंतनमग्न असणाऱ्या या पतिपत्नींबरोबर आलेले अभ्यागत चर्चा करण्याकरितां उत्सुक असत. बहुतेकांच्या भेटीचा उद्देश कांही चर्चा करावी व राष्ट्रीय व जागतिक प्रश्नांसंबंधी मार्गदर्शन मिळवावें, असाच असे. केवळ ओळख व गृहस्थीची मैत्री म्हणूनहि कांहीजण येत; जीवनाशीं ज्ञान वा चर्चा यांचा कांही लागाबांधा नसलेले साधे लोकहि येत. परंतु तसे थोड. प्राध्यापक, पंडित, संपादक, ग्रंथकार, दिल्लींतील विदेशी राजकीय दूत, राजकारणी, समाजसेवक, तत्त्वचिंतक अशाच देशी व विदेशी मंडळींचा अभ्यागतांत भरणा असे. कांही मंडळी जिवंत व ज्वलंत अशा चालूं विषयांवर चर्चा करण्याकरितां व माहिती घेण्याकरितां येत आणि कांहीं शाश्वत व अमर तत्त्वांचा परामर्श करण्याकरितां येत. सकाळीं चहा व स्नान झाल्यावर ९॥ वाजतां चर्चेचें 'सूत उवाच' व्हावयाचें तें दुपारीं १२ पर्यंत चालावयाचें. नंतर पुनः तिसऱ्या प्रहरीं ३॥ वाजतां सुरूं होऊन, मधून मधून विराम घेत, चर्चा-सत्र रात्रीं ११॥ ला समाप्त होई. एलनची झटपटीनें कामें उरकण्याची उमेद वाखाणण्यासारखी होती. वय ५० च्या आंतबाहेर असतांना २२ वर्षांच्या तरुणीची तरतरी तिच्या अंगांत होती कामाकरितां येरझारा घालतांना टाइपरायटरमधील टपटप पडणाऱ्या टाइपाच्या वेगानें तिचीं पावलें पडत. वेळेवर १०–१५ पाहुणेहि येऊन उतरावयाचे. त्यांचें स्नान, भोजन, चहापान, बिछाना, वस्त्रधावन इत्यादि सवप्रकारची व्यवस्था करण्यांत, दीड एकर पसरलेल्या सुरेख बागेची निगा राखण्यांत. दर आठवड्यास नियमितपणें निघणाऱ्या इंग्लिश साप्ताहिकाकरितां मजकूर तयार करून तो टाइपरायटरवरून भराभर काढण्यांत, आलेल्या देशी विदेशी पत्रव्यवहाराची विल्हेवाट ताबडतोब लावण्यांत व एम्. एन्. रॉय यांच्या लघुलेखद्वारा टिपलेल्या भाषणांचें पूर्ण लेखान्तर करण्यांत दक्ष असलेली एलन या चर्चेंतहि भाग घेई व पंडितांनाहि माना डोलावयास लावी. एम्. एन्. रॉय यांच्या निधनानंतर त्यांच्या देशोदेशी वास करणाऱ्या मित्रांचे एलनशीं अत्यंत सौहृदाचे संबंध राहिले याचें कारण तिचें दाक्षिण्य व सौजन्य यांनीं भरलेलें मधुर व्यक्तिमत्त्व होय. रॉय यांच्या निधनानंतर अखेरपर्यंत तिनें आश्रमांतच आपलें आयुष्य व्यतीत केलें. रॉय यांच्या वसतीची स्मृति एलनला रॉय यांच्या मानसिक सान्निध्यांत ठेवी. एलनच्या ठायीं अत्यन्त सुसंस्कृत व समर्पित अशा स्त्रीत्वाच्या उत्कर्षानें सीमा गांठली होतो.

## महत्त्वाच्या साधनांची जुळणी

१९५४ च्या जानेवारीमध्यें रॉय यांचें देहावसान झाल्यानंतर एलननें रॉय यांच्या विविध देशांतील कर्तबगारीचे निदर्शक असे विविध आधारलेख, वृत्तपत्रांचे अंक, पुस्तिका, पत्रें इत्यादि गोळा करण्यास प्रारंभ केला. त्याकरितां ती एकदां अमेरिकेला व युरोपला जाऊन आली. आणि या सर्व संग्रहाची जुळणी करून रॉय यांच्या कामगिरीचें यथार्थ ऐतिहासिक दर्शन व्हावें म्हणून त्याचें संशोधन सुरूं केलें. रॉय यांनीं स्थापलेल्या 'रॅडिकल ह्युमॅनिस्ट' या साप्ताहिकाचेंहि संपादन बिनचूक रीतीनें ती येथूनच करीत होती. तिच्या संशोधनाला व संग्रहाला चांगला आकार येऊं लागला होता. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट आंदोलनांतील विशेषतः भारतीय कम्युनिस्ट आंदोलनांतील फार महत्त्वाच्या घटनांचा व फेरबदलाचा संगतवार इतिहास निष्पन्न व्हावा इतकी महत्त्वाची साधनसामग्रीची जुळणी एलननें चालविली होती.

## सीमेवरील रखवालीण

एलनचें 'रॅडिकल ह्युमॅनिस्ट' हें साप्ताहिक ती कलकत्त्याहून संपादन करीत होती. त्यांत भारतीय व जागतिक राजकीय घडामोडींचें समालोचन ती करीत

होती. भारत आणि चीन यांच्या संबंधांत जो नवा सीमावाद निर्माण झाला, त्यांचेंहि साधकबाधक समालोचन निःपक्षपातीपणें व सप्रमाण ती करीत होती.

जिऑलॉजिकल सर्व्हेची मुख्य कचेरी डेहराडून येथें आहे. त्यांत भारत व चीन यांच्या सरहद्दीचें संशोधन सुरू आहे. या कचेरीच्या कामगारांचा एक संघहि तेथें आहे. त्यांत कम्युनिस्टांचा भरणा अधिक आहे. हा कामगार संघच कम्युनिस्ट चालवीत आहेत. या कचेरीतील कागदपत्रांना दोनदां आगी लागल्या. त्याचप्रमाणें कलकत्ता विमानतळावरून ब्रह्मदेशाला निघालेल्या भारतीय कर्मचाऱ्यांचें दप्तरहि पळविण्याचा प्रयत्न झाला.

या संबंधांत एलननें 'रॅडिकल ह्युमॅनिस्ट'मध्यें भारत सरकारला सावधगिरीचा इशारा देणारें टिप्पण लिहिलें. विशेषतः ही आग लागण्याचें कारण आकस्मिक नसून त्याच्या पाठीमागें आंतरराष्ट्रीय राजकारणाचा संबंध असला पाहिजे, अशीहि धोक्याची सूचना तिनें केली.

आपल्या वधाच्यापूर्वी कांहीं दिवस गृहमंत्री पं. पंत यांनाहि सावधगिरीची सूचना देणारें पत्र तिनें लिहिलें होतें असें सांगतात. भारत सरकारच्या दिल्लीच्या मंत्रालयांत व यंत्रणालयांत परदेशी गुप्तचरांचें जाळें असलेलें नुकतेंच उघडकीस आलें आहे. एलनचा थोर पति हा भारतीयच होता. तीहि मनानें संपूर्ण भारतीय बनली होती. विचारानें अत्यंत कणखर व विलक्षण निश्चयी अशी ध्येयवादी स्त्री प्रत्यक्ष सीमावादाच्या क्षेत्रांतच वस्ती करून राहिली होती. अत्यंत तीक्ष्ण बुद्धीचा, निरंतर जागरूक व चौफेर दृष्टि फेकणारा भारताचा हा निश्चयी पहारेकरीच होता. हा पहारेकरी मारला गेला आहे.

एलनचा वध झाल्याची परिस्थिति अत्यंत लक्षांत घेण्यासारखी आहे. त्या परिस्थितीचा तपशीलवार अभ्यास करणें जरूर आहे. दिनांक १३ डिसेंबर १९६० ची रात्र. ती झोंपी जाण्याच्या अगोदर तिचा वध झाला आहे. रात्रीं भोजनाकरितां तिचे दोन परिचित तिच्याकडे आले होते. एका जहागिरदाराची पत्नी व आश्रमांतच राहाणारा एक प्रौढ जर्मन विद्यार्थी हे दोघे पाहुणे रात्रीं साडेदहाच्या सुमाराला जेवून निरोप घेऊन गेले. तिच्या कुटींतील शेकोटीजवळील जागेंत तिचें वध केलेलें शरीर सांपडलें. डोळे गच्च बांधले होते; तोंडांत बोळा कोंबला होता. झोपीं जाण्याच्या अगोदर जे कपडे उतरून ठेवावयाचे असतात, ते तिनें उतरून ठेवले नव्हते. किंवा बिछान्यावर जाण्याच्या वेळीं ती नेहमी जो वेष धारण करीत होती तोहि तिनें धारण केला नव्हता. तिच्या एका पायांतलें पादत्राण तेवढें त्या प्राणघातक झटापटींत निसटून पडलें होतें. तिला भोसकलें नव्हतें म्हणतात. तिच्या डोक्यावर हातोडीसारख्या हत्यारानें घाव घातलेले होते असें म्हणतात. तिची कोणतीहि चीजवस्तू तेथून हिरावलेली दिसली नाहीं. तिच्या हातांतलें घड्याळ सुद्धां तेथेंच सांपडलें. ती आपल्या कुटीचा विशेष बंदोबस्त कधीच करीत नव्हती. कोणीहि तोडमोड न करतां सहज शय्यास्थानापर्यंत जाऊं शकेल, इतका मोकळेपणा तेथें चोवीस तास नेहमीं असे. कोठले दिवेहि मालवले नव्हते.

चोरच्या मुरच्यांची ही घरफोडी आहे असें मानणें म्हणजे योग्य तपास लावण्याची जबाबदारी टाळणें होय. ट्रॉट्स्कीचा वध सुद्धां हातोडीसारख्याच हत्यारानें घडविला होता. ही गोष्ट पुष्कळांच्या स्मरणांत असेल. ज्या प्रकारचें हत्यार अंगावर सांपडलें असतां खुनाचा वहीम यावा, असें कसलेंहि हत्यार न बाळगण्याची दक्षता या वधांत दिसून येते.

जन्मानें परदेशी असलेल्या एका विदुषी आश्रमवासिनी तपस्वीनीची ही हत्या आहे. स्वदेशाबद्दल अभिमान वाटणाऱ्या कोणत्याहि भारतीय माणसाला या वधामुळें खालीं मान घालाविशी वाटेल. माझ्या देशांत अशा प्रकारचा वध व्हावा काय ? असें चिंतेचें शल्य मनांतून केव्हांहि जाणें शक्य नाहीं.

धनहीन व सत्ताहीन एलन. तिचा कोणाहि व्यक्तीशीं, जातीशीं, धर्माशीं, देशाशीं व पक्षाशीं हेवादावा नव्हता. ती केवळ वैचारिक जीवनांत रमलेली होती. गतपतीच्या वैचित्र्यपूर्ण चरित्राच्या ऐतिहासिक प्रमाणांची जुळणी करीतच पतीच्या मानसिक सान्निध्याची सविकल्प समाधि तिला लाभली होती. अशा स्थितींत तिच्या प्राणहरणाचा संकल्प करणारीं माणसें कशीं आहेत, याचा विचार मनांत येतो व वाटतें कीं, माणूस मुळांत चांगला आहे, असें जें सन्त व नीतिशास्त्रज्ञ समजतात त्याला काय अर्थ आहे ? अशीं माणसें ज्या जगांत वावरतांत त्या जगांत मनुष्यजातीचें भवितव्य अत्यन्त धोक्यांत आहे असेंच म्हणावें लागतें.

डॉ. ना. र. इनामदार

# भारतीय राष्ट्रपतींचे अधिकार

भारताचे राष्ट्रपति डॉ. राजेन्द्रप्रसाद यानीं भारतीय विधिसंस्थेपुढें २८ नोव्हेंबर १९६० रोजीं केलेल्या भाषणांत भारतीय राष्ट्रपतीचे अधिकार व स्थान यांविषयीं कांहीं विचार प्रगट केले. ब्रिटनच्या राज्यप्रमुखाच्या अधिकारांसारखेच भारतीय राष्ट्रपतीचे अधिकार आहेत, कां ते मूलत: निराळे आहेत, याचा अभ्यास करण्याची आवश्यकता आहे हें त्यांनीं त्या भाषणांत प्रतिपादिलें. वर्तमानपत्रांच्या स्तंभलेखकांनीं यापाठीमागें डॉ. राजेन्द्रप्रसादांचा कांहींतरी राजकीय हेतु दडलेला असावा असा निर्वाळा दिला. परंतु स्वतः राष्ट्रपतींनीं आपल्या भाषणांत या विषयाचा अभ्यास केवळ तात्विक दृष्टिकोनांतून व्हावा असें सांगितल्यामुळें या भाषणामागील राजकीय हेतु हुडकून काढण्याचा उद्योग फलद्रूप होणार नाहीं. पंडित नेहरूंनींहि पत्रकार परिषदेपुढें नंतर दिलेल्या निवेदनांत हे विचार प्रगट करण्यामध्यें डॉ. राजेन्द्रप्रसादांचा कांहींहि अंतस्थ हेतु नसल्याचें आश्वासन दिलें. गेल्या आठ वर्षांमधील राष्ट्रपतींच्या वर्तनावरून त्यांचें भारतीय शासनांतील स्थान इंग्लंडच्या राज्यप्रमुखाच्या स्थानापेक्षां मूलतः निराळें नाहीं हें सिद्ध झालें आहे. पण राष्ट्रपति व पंतप्रधान यांच्या संबंधाविषयीं घटनेंत असलेल्या तरतुदी कांहीं अंशीं संदिग्ध असल्यामुळें त्या तरतुदींचे निरनिराळे अर्थ लावण्यांत येतात. सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायाधीशांनींहि परस्परविरुद्ध प्रणाली पुढें मांडल्या होत्या.

भारतीय राष्ट्रपतींनीं आपल्या भाषणांत भारतीय शासन संसदीय पद्धतीचें आहे हें मान्य केलें आहे. इंग्लंडमध्यें राजा नामधारी आहे अशी प्रथा अठराव्या शतकापासून प्रस्थापित झाली आहे, तशा प्रकारची प्रथा भारतांत रूढ होणें खरोखरीच आवश्यक आहे काय अशी पृच्छा डॉ. राजद्रप्रसाद यांनीं केली आहे. इंग्लंडमध्यें राजाचें व कॉमनवेल्थचीं सदस्य राष्ट्रें कॅनडा, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड यांमध्यें गव्हर्नर जनरलचें नामधारी स्थान प्रथेमुळें रूढ झालें आहे तसेंच भारतीय राष्ट्रपतीचें आहे हें डॉ. प्रसाद व पं. नेहरू या दोघांनींहि मान्य केलें आहे. ही प्रथा इंग्लंडमध्यें प्रस्थापित झाली आहे म्हणून केवळ आपणहि अंगिकारावी काय अशी शंका डॉ. राजेंद्रप्रसाद यानीं विचारली आहे.

## राज्यघटनाकारांचा हेतु

राष्ट्रपतीच्या स्थानासंबंधींचा घटनाकारांचा हेतु घटनापरिषदेमधील चर्चेमध्यें स्पष्ट झालेला आहे. इंग्लंडमधील राज्यप्रमुख व राष्ट्रकुलाचीं सदस्यराष्ट्रें कॅनडा, ऑस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका व न्यूझीलंड यांमधील गव्हर्नर जनरल घटनाकारांच्यापुढें राष्ट्रपतीचें स्थान निश्चित करतांना होते. राष्ट्रपति निवडून येत असल्यामुळें त्याचें स्थान वंशपरंपराधिष्ठित ब्रिटिश राज्यप्रमुखाहून व नेमणूक झालेल्या गव्हर्नरजनरलहून उच्च आहे हें निर्विवाद आहे. मसुदासमितीच्या अध्यक्षानीं या शब्दांत राष्ट्रपतीचें स्थान विशद केलें आहे.

> इंग्लंडच्या राजाचें इंग्लिश राज्यघटनेंत जें स्थान आहे तेंच राष्ट्रपतीचें घटनेच्या मसुद्यांत आहे. राष्ट्रपति राज्याचा प्रमुख आहे पण कार्यकारिणीचा नाहीं; राष्ट्राचा प्रतिनिधि आहे पण तो राष्ट्रावर सत्ता गाजवीत नाहीं. राष्ट्राचा तो प्रतीक आहे.



अनुक्रमणिका

–( कॉन्स्टिट्यूअन्ट असेंब्ली डिबेट्स्, ७, पृ. ३२)

घटनापरिषदेचे अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद यांनींहि डॉ. आंबेडकरांप्रमाणेंच मत प्रदर्शित केलें. ते म्हणाले;

> आपल्याला निर्वाचित राष्ट्रपति व निर्वाचित संसद यांची सांगड घालावयाची होती. त्याकरितां इंग्लंडच्या राजाचें जें स्थान आहे तें राष्ट्रपतींना दिलें आहे. सनदशीर राष्ट्रपति हीं ती भूमिका होय.

– ( कॉ. अ. डि., १०, पृ. ९८८ )

संसदीय शासनपद्धतीची ओळख आपल्याला ब्रिटिश अंमलामध्यें झालेली होती. त्यामुळें त्या पद्धतीचा अवलंब होणें साहजिक होतें. अमेरिकेंतील राष्ट्राध्यक्षपद्धतीचा अवलंब आपण करावा असें श्री. के. टी. शहा यांनीं सुचविलें होतें. परंतु त्या सूचनेला पाठिंबा मिळाला नाहीं. सत्ताविभागणीच्या सिद्धान्तावरील श्रद्धा व कार्यकारिणी लोकांना प्रत्यक्ष जबाबदार असली पाहिजे असा ठाम विश्वास यामुळें अमेरिकेंत राष्ट्राध्यक्षपद्धति अंगिकारण्यांत आली. भारतांत ब्रिटिश राज्यपद्धति रूढ झाल्यामुळें संसदीय पद्धतीशिवाय इतर पद्धतीचा ओझरता सुद्धां पुरस्कार येथें झाला नाहीं. प्रत्यक्ष अनुभवानें माहीत नसलेल्या पद्धतीचा अंगीकार करण्यांत जोखीम आहे असें घटनाकारांना वाटल्यास त्यांत वावगें असें कांहीं नव्हतें. नेमणुकांची आपल्या पाठीराख्यांमध्यें खैरात करण्याची पद्धत ( Spoils System ) व विधिमंडळ आणि कार्यकारिणी – यांतील सुसंगतीचा अभाव हे अमेरिकेंतील पद्धतीचे दोष घटनाकारांना फार महत्त्वाचे वाटले व म्हणून त्यांनीं ती पद्धत विचारांत घेतली नाहीं. त्यांचबरोबर देशी संस्थानांचे अधिपति राज्यपाल म्हणून येतील व मग राजेशाहीच निराळ्या स्वरूपांत अस्तित्वांत येईल अशी भीति कांहीं सदस्यांनीं घटनासमितींत व्यक्त केली.

## घटनेंतील तरतुदी

राष्ट्रपति व मंत्रिमंडळ यांचे संबंध विशद करणाऱ्या घटनेंतील तरतुदी खालीलप्रमाणें आहेत :–

अनुच्छेद ५३. ( १ ) संघाची कार्यकारी सत्ता राष्ट्रपतीकडे राहील. तो त्या सत्तेचा वापर या घटनेनुसार प्रत्यक्ष अगर त्याला दुय्यम असणाऱ्या अधिकाऱ्यांमार्फत करील.

अनुच्छेद ७४. ( १ ) राष्ट्रपतीला त्याच्या कार्यांत मदत करण्यासाठीं आणि सल्ला देण्यासाठीं प्रधानमंत्र्याच्या नेतृत्वाखालीं एक मंत्रिमंडळ असेल.

( २ ) मंत्रिमंडळानें राष्ट्रपतीला एखादा सल्ला दिला कीं नाहीं, किंवा दिला असल्यास काय दिला, या बाबतींत कोणत्याहि न्यायालयांत चौकशी केली जाणार नाहीं.

अनुच्छेद ७५. ( १ ) प्रधानमंत्र्याची नेमणूक राष्ट्रपति करील आणि इतर मंत्र्यांची नेमणूक प्रधानमंत्र्याच्या सल्ल्यानें राष्ट्रपति करील.

( २ ) राष्ट्रपतीची मर्जी असेतोंपर्यंत हे मंत्री अधिकारपदावर राहतील.

( ३ ) मंत्रिमंडळ हें संयुक्तपणें लोकसभेला जबाबदार राहील.

( ५ ) जर एखादा मंत्री सतत सहा महिनेपर्यंत, पार्लमेंटच्या कोणत्याहि सभागृहाचा सभासद नसेल, तर ती मुदत संपताच तो मंत्री म्हणून राहणार नाहीं.

अनुच्छेद ७७. ( १ ) भारत सरकारची सर्व अंमलबजावणी राष्ट्रपतीच्या नांवें केली आहे, असें स्पष्टपणें नमूद केलें जाईल.

( २ ) राष्ट्रपतीच्या नांवें काढलेले आणि अंमलांत आणलेले हुकूम आणि पत्रक हे राष्ट्रपति करील त्या नियमांनुसार व त्या पद्धतीनें प्रमाणित केले जातील; आणि अशा प्रकारें प्रमाणित केलेला एखादा हुकूम अगर पत्रक हा राष्ट्रपतीनें केलेला अगर बजावलेला हुकूम अगर पत्रक नाहीं, या



अनुक्रमणिका






सबबीवर त्याच्या कायदेशीरपणाबद्दल प्रश्न उपस्थित करतां येणार नाहीं.

( ३ ) भारत सरकारचा कारभार अधिक सोईस्कर रीतीनें चालविण्याकरितां आणि त्या कारभाराची वांटणी मंत्र्यांमध्यें करून देण्याकरितां राष्ट्रपति नियम करील.

अनुच्छेद ७८. मुख्य प्रधानाचें कर्तव्य पुढीलप्रमाणें असेल—

( अ ) संघाच्या कारभाराबाबत आणि नवीन कायद्याच्या सूचनेसंबंधीं मंत्रिमंडळाचे सर्व निर्णय राष्ट्रपतीस कळविणें;

( ब ) संघाच्या कारभाराबाबत आणि सूचित कायद्याबाबत राष्ट्रपति मागेल ती माहिती पुरविणें;

( क ) एखाद्या मंत्र्यानें एखाद्या गोष्टीबाबत निर्णय घेतला असेल आणि त्याचा जर मंत्रिमंडळानें विचार केला नसेल, तर राष्ट्रपतीनें सांगितल्यास तो मंत्रिमंडळापुढें विचारार्थ ठेवणें.

**प्रथेनें नामधारी**

या तरतुदींवरून घटनाकारांच्या मनांत असलेल्या संसदीय पद्धतीची निश्चित कल्पना येते. राष्ट्रपतीच्या मुखत्यारींतील अधिकारांचीहि त्यांवरून कल्पना येते. प्रधानमंत्र्याची नेमणूक [ अनुच्छेद ७५ (१) ] आणि मंत्र्यांचें अधिकारवास्तव्य [ अनुच्छेद ७५ ( २ ) ] याविषयीं राष्ट्रपतीला मुखत्यारींतील अधिकार आहेत. इंग्लंडमध्यें मंत्र्यांचें अधिकारवास्तव्य राजाच्या मर्जीवर अवलंबून न रहातां तें पंतप्रधानाच्या हातांत असतें; भारतांतहि हीच प्रथा पाळण्यांत येत आहे. पंतप्रधानाच्या नेमणुकीबाबतचा अधिकार राष्ट्रपतीच्या हातांतील आहे. जोपर्यंत लोकसभेमध्यें बहुमताचें पाठबळ असणारा एक पक्ष किंवा स्थिर संयुक्त आघाडी (coalition) असते तोपर्यंत या पक्षाच्या वा आघाडीच्या नेत्याला मंत्रिमंडळ बनविण्यासाठीं निमंत्रण करणें राष्ट्रपतीवर बंधनकारक आहे. ज्यावेळीं लोकसभेंतील एकाहि पक्षनेत्याच्या मागें बहुसंख्य सभासदांचा पाठिंबा नसेल त्याच वेळीं मंत्रिमंडळ बनविण्यासाठीं कोणत्या नेत्याला पाचारण करावें ही राष्ट्रपतीच्या मर्जीवरची बाब राहील. प्रधानमंत्र्याच्या मागें लोकसभेंतील बहुसंख्य सभासदांचें पाठबळ नाहीं असें राष्ट्रपतीच्या आढळांत आलें व कोणत्याहि नेत्याला बहुमताचें पाठबळ मिळण्याचा संभव नाहीं अशी त्याची खात्री झाली तर राष्ट्रपति लोकसभा विसर्जित करून निवडणुकीचा हुकूम देईल. महत्त्वाकांक्षी राष्ट्रपतीला अंमल गाजवावयाचा असेल तर त्याला लोकसभेंत बहुमताचा पाठिंबा मिळविणारा प्रधानमंत्री नेमावा लागेल; आणीबाणीच्या काळांत मंत्रिमंडळाला बाजूला ठेवून सत्ता गाजवावयाची असेल तर संसदेचा राष्ट्रपतीला पाठिंबा मिळवावा लागेल.

'राष्ट्रपतीनें मंत्रिमंडळाचा सल्ला मानलाच पाहिजे' अशी तरतूद जर घटनेंत किंवा राष्ट्रपतीला द्यावयाच्या सूचनापत्रांत असती तर वर दिलेले राष्ट्रपतीचे मुखत्यारींतील अधिकार अस्तित्वांत नसते. राष्ट्रपति प्रथेनें नामधारी बनावा अशी घटनाकारांची अपेक्षा होती म्हणून अशा तऱ्हेची तरतूद घटनेंत समाविष्ट केली नाहीं. राष्ट्रपतीला सूचनापत्र ( Instrument of Instructions ) देण्याचा विचार मसुदासमितीचे अध्यक्ष डॉ. आंबेडकर यानीं घटनासमितीचे अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या शंकेचें निरसन करतांना व्यक्त केला होता. पण अशी प्रथाच रूढ व्हावी हा विचार शेवटीं स्वीकारण्यांत आला.

आयर्लंडच्या घटनेनें तेथील राष्ट्राध्यक्षाकडे प्रधानमंत्र्याच्या नेमणुकीबाबत कसलाहि अधिकार ठेवला नाहीं. कनिष्ठ विधिमंडळाच्या मतानें प्रधानमंत्री व त्याचे सहकारी अधिकारावर येतात. शिवाय, घटनेच्या २८ ( २ ) या कलमान्वयें राज्यांतील कार्यकारी सत्ता सरकारच्या हुकुमानें वा हुकुमाप्रमाणें वापरण्यांत आली पाहिजे असें बंधन



अनुक्रमणिका








घालण्यांत आलें आहे. भारताच्या राज्यघटनेंत अशा प्रकारची तरतूद नसल्यामुळें उपरिनिर्दिष्ट मर्जीतले अधिकार राष्ट्रपतीला प्राप्त झाले आहेत.

ब्रिटिश राष्ट्रकुलाच्या कॅनडा, आस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका व न्यूझीलंड या सदस्यराष्ट्रांमधून जबाबदार राज्यपद्धतीचें तत्त्व प्रथेनें स्थिर पायावर प्रस्थापित झालें आहे. कॅनडाचा गव्हर्नर-जनरल व त्याचें कार्यकारी मंडळ यांचे संबंध दर्शविणारें ब्रिटिश नॉर्थ अमेरिका ॲक्टचें ११ वें कलम व भारतीय राज्यघटनेचा ७४ (१) हा अनुच्छेद यांची भाषा सारखी आहे. राष्ट्रप्रमुखाला साहाय्य करण्यासाठीं व सल्ला देण्यासाठीं कार्यकारीमंडळ नेमावें अशी भाषा दोन्हीकडे वापरण्यांत आली आहे. ऑस्ट्रेलियाच्या घटनेंतहि अशीच भाषा आढळते. कॅनडाच्या घटनेंत तर मंत्र्यांचा उल्लेख 'प्रिव्ही कौन्सिलर्स' असा करण्यांत आला आहे. कनिष्ठ विधिसभेचें विसर्जन ही एक बाब सोडली तर इतर बाबतींत गव्हर्नर-जनरल मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें काम करतो. कॅनडाच्या गव्हर्नर-जनरलनें प्रधानमंत्र्याला विधिसभा विसर्जन करण्याचा नकार देण्याचा सर्वांत अलीकडचा प्रसंग १९२६ साली उद्भवला होता. ऑस्ट्रेलियांत असा प्रसंग १९०९ मध्यें घडला. दक्षिण आफ्रिकेंत युद्ध पुकारण्याच्या मुद्द्यावर ग. ज. नें प्रधानमंत्री ज. हर्झोग याला राजीनामा द्यावयास भाग पाडलें व त्याच्या म्हणण्याप्रमाणें विधिसभा विसर्जित केली नाहीं. भारतीय राष्ट्रपतीलाहि हा मर्जीतला अधिकार आहे; अस्थिर परिस्थितींतच तो वापरला जाईल. पक्षपाती दृष्टीनें राष्ट्रपति हा अधिकार वापरणार नाहींत अशी सर्वांची अपेक्षा असणार.

कॅनडा व ऑस्ट्रेलिया या देशांतील गव्हर्नर-जनरल व भारतीय राष्ट्रपति यांच्या स्थानांत कांहीं फरक नाहीं. भारतीय राष्ट्रपति निर्वाचित आहे, गव्हर्नर-जनरल नेमलेला असतो हाच एक फरक आहे. इंग्लंडमध्यें राजानें काढलेल्या हुकुमावर मंत्र्याची सही लागते, त्यामुळें त्या कृत्यासंबंधींची जबाबदारी मंत्र्यावर (व धोरण अनुस्यूत असेल तर मंत्रिमंडळावर) पडते. कॅनडा, आस्ट्रेलिया व भारत या देशांत अशी सही लागत नाहीं. घानाचा राष्ट्राध्यक्ष अमेरिक अध्यक्षासारखा कार्यकारी अधिकाराच्या बाबतींत स्वतंत्र आहे, तो आपल्या मर्जीनुरूप कार्यकारी सत्ता वापरतो. घानाच्या अध्यक्षाचे मंत्री विधिसभेला जबाबदार ठेवण्यांत आले आहेत. फ्रान्समध्यें अध्यक्षास मर्जीतले अधिकार देण्यापूर्वी पूर्वीच्या संसदीय पद्धतीच्या घटनेचा त्याग करावा लागला ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. मंत्रिमंडळाचा सल्ला न जुमानणाऱ्या राष्ट्रपतीची चौकशी ६१ व्या अनुच्छेदानुसार होईल. जर संसदेंतील बहुमताचा पाठिंबा राष्ट्रपति मिळवूं शकत असेल तर चौकशीचा प्रसंग टळेल.

## संसदेचें महत्त्व

पंतप्रधान व राष्ट्रपति यांमध्यें जर अटीतटीचा झगडा झाला तर संसद ज्याच्या बाजूला आहे त्याचें पारडें झुकेल. आपण अर्थात् घटनेच्या भाषेत विचार करीत आहोंत. लष्करी शक्तीचा समावेश सध्यां आपण कोणत्याच पक्षाच्या बाजूनें केलेला नाहीं. आशियांतील इतर राष्ट्रांमध्यें लष्करी शक्ति प्रबळ ठरलेली आहे. ती पंतप्रधान व राष्ट्रपति यांच्या सनदशीर पक्षाच्या विरुद्ध उभी राहील किंवा त्यांपैकीं एकाला पाठिंबा देईल. घटनाबाह्य परिस्थितींत लष्करी शक्तीचा विचार करणें आवश्यक ठरेल.

भारतीय संसदेला राष्ट्रपतीशिवाय अन्य अधिकाऱ्यांकडे कामें सोपविण्याचा अधिकार आहे [ अनुच्छेद ५३ (२) (ब) ]. तसाच अधिकार घटनेंत तरतूद न केलेल्या कसल्याहि अडचणीच्या प्रसंगी संसदेला प्राप्त होतो ( अनुच्छेद ७० ); या अनुच्छेदानुसार राष्ट्रपतीचीं कामें पार पाडण्यासाठीं संस-



अनुक्रमणिका

देता योजना करण्याचा अधिकार पोहोचतो. यांवरून राष्ट्रपति व पंतप्रधान यांच्यावर एक सार्वभौम यंत्रणा आहे हें सिद्ध होतें.

संघराज्याच्या विधेयकांचा फेरविचार करावयास लावण्याचा एकमेव अधिकार राष्ट्रपतीच्या मुखत्यारींतील आहे. ( उदा. पेप्सु अर्थविधेयक ) सर्वोच्च सेनापति म्हणून करावयाचीं कामें मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें करावीं लागतात. शिक्षेसंबंधीं क्षमा व सूट, वटहुकूम, आणीबाणीच्या प्रसंगाचा जाहीरनामा, राज्यपालाकरवीं राज्यांच्या कारभारार्चे निरीक्षण, संसदेसमोरील भाषणें व संदेश, राज्यांच्या विधेयकांना द्यावयाची संमति, काश्मीर घडामोडी या व इतर सर्व बाबतींत राष्ट्रपति मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानुसार वागतात.

घटना जतन करण्याची, संरक्षिण्याची व तिचें समर्थन करण्याची जबाबदारी घटनेनें राष्ट्रपतीवर टाकली आहे. त्या जबाबदारीला आनुषंगिक असे अधिकार राष्ट्रपतीला वापरता येतील काय ? घटनेनें राष्ट्रपतीला ' घटनात्मक राज्यप्रमुख ' ही भूमिका दिली आहे. सामान्यतः तीच भमिका पार पाडण्याची घटनात्मक जबाबदारी राष्ट्रपतीवर आहे. ज्यावेळीं बहुमतवाला पक्ष वा आघाडी लोकसभेंत असणार नाहीं त्यावेळीं राष्ट्रपतीला मर्जीतले अधिकार वापरण्यास संधि मिळेल. मंत्रिमंडळाच्या विचारसरणीवर व निर्णयांवर राष्ट्रपतीला प्रभाव पाडतां येईल. राष्ट्रपतीची मुदत संसदेच्या आयुष्यमर्यादेहून वेगळी व स्वतंत्र ठेवण्यांत आली आहे; तसेंच राष्ट्रपतीची मिळकत संचित निधींतून मिळते, संसदेच्या मतावर ती अवलंबून नाहीं. यावरून राष्ट्रपतीला घटनेंत वेगळें स्थान आहे असें म्हणतां येईल. संसद व मंत्रिमंडळ यांत बदल झाले तरी शासनयंत्रणा स्थिर रहावी हा यामागील उद्देश आहे. राष्ट्रपतीच्या निवडणुकीची पद्धत अशी आहे कीं देशव्यापी प्रमुख पक्षाच्या पाठिंब्याशिवाय कोणताहि इच्छुक निवडून येऊं शकणार नाहीं. संसदेंतील बहुमतवाल्या पक्षाशीं न जुळणारा परंतु राज्यांतील विधानसभांच्या बहुसंख्य सभासदांचा पाठिंबा असणारी व्यक्ति राष्ट्रपति म्हणून निवडून येऊं शकेल अशी कल्पना आपण करूं शकतो. पण लोकसभा व राज्यविधानसभा यांची निवडणूक एकाच वेळीं होत असल्यानें लोकसभेंतील बहुमतवालापक्ष राज्यविधानसभेंतून अगदीं अल्पमतवाला होईल हें संभवत नाहीं, पण कांहीं राज्यांतन तो अल्पमतधारी होणें शक्य आहे. लोकसभेंतील बहुमतास जबाबदार असणाऱ्या मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें राष्ट्रपतीनें कारभार केला पाहिजे. राष्ट्रपति लोकसभेंतील या बहुमताच्या विरुद्ध राज्यविधानसभेच्या बहुमतावर निवडून आला असेल तर राष्ट्रपति विरुद्ध मंत्रिमंडळ या झगड्याचें स्वरूप वस्तुतः संघ वि. राज्यें असें राहील. असा प्रसंग उद्भवूं नये अशीच या देशांतील लोकशाहीवर श्रद्धा असणाऱ्यांची इच्छा राहील.

---








प्रा. चंद्रकांत बांदिवडेकर

# हिंदी कादंबरीतील आधुनिक प्रवृत्ति

हिंदी कादंबरीच्या आधुनिक प्रवृत्तीचा विचार करतांना प्रारभींच आधुनिक शब्दांतला अभिप्राय स्पष्ट करून घेतलेला बरा. ईश्वर, समाज, धर्म आणि परंपरा यांच्या वेदीवर आत्मार्पण करण्याच्या प्रक्रियेंतला फोलपणा जेव्हां व्यक्तित्व-जागृत माणसाला कळून चुकला आणि याविरुद्ध आपल्यात झगडून व्यक्ति म्हणून आपला मोठेपणा आणि हक्क प्रस्थापित करण्याची वेळ आली आहे असें त्याला वाटलें तेव्हांच आधुनिक युगाला सुरवात झाली असें म्हटलें पाहिजे. यंत्रयुगाबरोबरच ही आधुनिकतेची जाणीव पाश्चात्य देशांत निर्माण झाली असली तरी भारतामध्यें त्या कल्पनेचा इतिहास फारसा मोठा नाहीं. आगरकरांसारख्या एखाद्याच विचारवंतानें एकोणीसाव्या शतकामध्यें इंग्रजी वाङ्मयाच्या प्रगाढ परिशीलनानें ही आधुनिकतेची कल्पना आत्मसात् केली होती. ललित साहित्यामध्यें – हिंदी भाषेपुरतेंच बोलायचेंतर ही कल्पना १९२० च्या दरम्यान प्रविष्ट होऊं लागली. हिंदी कादंबरीतील आधुनिक प्रवृत्तींचा उन्मेष या ४० वर्षांतलाच आहे असें म्हटलें तर फारसें चूक होणार नाहीं. कादंबरीमध्यें सामान्यपणें मनुष्याचें चित्रण सामाजिक परिस्थिति, परम्परा, नैतिक मूल्यें यांच्या संदर्भात होत असतें तर काव्यामध्यें मनुष्य आपल्या वैयक्तिक अनुभवांना व्यक्तता देत असतो– तेव्हां कादंबरी आणि काव्य यांतील प्रवृत्तींचा विचार केल्यावर हिंदी साहित्यांत आज मनुष्य कोणत्या रूपांमध्यें उपस्थित आहे याची कल्पना येऊं शकेल. निरनिराळ्या भाषेंतील वाङ्मयप्रवृत्तींचा विचार साधारणतः अशासाठीं केला जात असावा कीं साहित्यनिर्मिति करणाऱ्या कलावंताचा मनुष्य आणि जीवन यांच्याकडे पहाण्याचा दृष्टिकोण कसा आहे हें स्पष्ट व्हावें. आपल्या विकासासाठीं अहर्निश प्रयत्न करणाऱ्या माणसाच्या धडपडीबद्दल प्रतिभाशाली कलावंताची काय प्रतिक्रिया आहे, मानवजीवनाविषयीं त्याची आस्था किती दृढ आहे इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें आपल्याला हवीं असतात. आपली जीवनदृष्टि कलेच्या मर्यादा संभाळून आणि शक्तीचा योग्य वापर करून कलेच्या पातळीवरून व्यक्त करण्यांत तो यशस्वी झाला आहे काय– झाला असल्यास कितपत झाला आहे हा प्रश्नहि साहित्याची पातळी ठरविण्याच्या दृष्टीनें विचारांत घेतला जावा.

**प्रेमचंदांच्या कादंबऱ्या**

१९१८ साल हें हिंदी कादंबरीच्या इतिहासामध्यें महत्त्वाचें आहे. कारण प्रेमचंदाची 'सेवासदन' ही कृति नवीन युगाचें प्रवर्तन करण्यासाठींच जन्मली. बहिर्मुखी आणि सुधारक प्रेमचंदांना आज व्यक्तिवादी कादंबरीकारांमध्यें गणलें जात नाहींच; उलट स्त्री, एकत्र कुटुंब, यंत्र याबद्दलचे त्यांचे विचार परम्परानिष्ठ आणि प्रतिगामी स्वरूपाचेच मानले जातात. तेव्हां त्यांच्या आधुनिकतेबद्दल संशय घेतला जाणें स्वाभाविक आहे. पण हिंदी-भाषी क्षेत्रांतले सामाजिक आणि साहित्यिक विचार लक्षांत घेतले तर प्रेमचंदजीना उग्र सुधारक निश्चितपणें म्हणावें लागेल. प्रेमचंदांच्या पूर्वी हिंदी सामाजिक कादंबऱ्यांची परंपरा सुमारे ३०।३५ वर्षे सांपडते. या परंपरेंत तीन प्रमुख प्रवृत्ति दिसतात. शुष्क उपदेश सांगण्यासाठीं नीरस कथानकाची बांधणी करायची आणि मधून मधून रसात्मकतेसाठीं भडक वासनांनीं युक्त अशी चित्रणें पेरायचीं ही एक प्रवृत्ति. दुसरी प्रवृत्ति अद्भुतरम्य कादंबऱ्याची. यांत अद्भुताच्या साहाय्यानें कथानकांत आश्चर्यकारक वळणें निर्माण करून वाचकांच्या उत्कंठेची वीण सारखी ताणत ठेवण्यावर अधिक भर असे. जादूटोणा आणि मंत्र-तंत्र यांच्या साहाय्यानें खलनायकानें नायकनायिकांवर संकटपरंपरा आणायची आणि त्याच साहाय्यानें नायकानें आपल्या संकटांतून बाहेर पडायचें. घटनांची भाऊगर्दी आणि लागतील तेवढ्या पात्रांचे ठोकळे लेखकाच्या हातीं तयार असत. पण यांतहि लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं देवकीनंदन खत्री










यांच्यासारख्या लेखकानें अशा कादंबऱ्या लिहून लोकप्रियता मिळवलीच पण उर्दू जाणकारांनींहि त्यांच्या कादंबऱ्या वाचायला हिंदी शिकून घेतलें ! वाचकांचा मोठा वर्ग निर्माण करण्याचें श्रेय देवकीनंदन खत्री यांना दिलें जातें. तिसरी प्रमुख प्रवृत्ति– रहस्यमय कादंबऱ्यांची. यांत गोपालराम गहमरी यांचें नांव लक्षांत ठेवण्यासारखें आहे. घटनांची निर्मिती आणि पात्रांचीं संख्या यांत मितव्ययतेचें थोडेंफार धोरण रहस्यमय कादंबऱ्यांच्या प्रकृतिधर्माप्रमाणेंच आलें आणि कथानकाच्या वळणांना बौद्धिक कार्य-कारण-संगतीची आवश्यकता भासूं लागली. अशा परिस्थितिमध्यें प्रेमचंद आले.

प्रेमचंदांच्या पुढें अनेक अडचणी होत्या. वाचकवर्गाला वरील प्रकारच्या कादंबऱ्या वाचण्याची संवय झाली होती. सामान्यपणें त्याची रसिकता बाल्यावस्थेंत होती. कादंबरीसारख्या वाङ्मयप्रकारापासून केवळ मनोरंजनाचीच अपेक्षा तो करीत होता. हें मनोरंजन देखील अगदींच सामान्य प्रतीचें होतें. या परिस्थितीला वळण लावायला प्रेमचंदांना किती प्रयास पडले असतील याची यावरून कल्पना यावी. याशिवाय महाराष्ट्रांत सामाजिक, राजकीय विचारांचें जें वैचारिक मंथन चालू होतें तशा तऱ्हेची वैचारिक पृष्ठभूमिहि प्रेमचंदांना मिळाली नव्हती. लोकहितवादी, रानडे, फुले, आगरकर, गोखले, यांच्या विचारांची बैठक मराठी साहित्याला मिळाली तशी हिंदी साहित्यिकांना मिळाली नाहीं. या सर्व गोष्टींचा परिणाम प्रेमचंदांच्या व त्यांच्या अनुयायांच्या साहित्यावर झाला ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. शुष्क नैतिक उपदेशप्रधान कादंबऱ्या, अद्भुतरम्य, अवास्तव कल्पनाचमत्कारांवर आधारलेल्या कादंबऱ्या आणि रहस्यमय कादंबऱ्या यांचें युग संपवून हिंदी कादंबरीला जीवनोन्मुख करण्याचें महनीय कार्य प्रेमचंदांनीं केलें. कादंबरी म्हणजे स्वप्नपूर्तीचा आनंद देऊन हलकें मनोरंजन करणारें साधन नसून मानवीजीवन समग्रतेनें व्यक्त करणारें तें एक साधन आहे. समाजाच्या संदर्भात स्वतःला पाहण्याचा त्यांत प्रयत्न केलेला असतो. आणि हा प्रयत्न केवळ जिज्ञासापूर्तिसाठीं नसून समाजाबद्दलची आपली कर्तव्यभावना जागृत करून व्यक्तीला प्रेरणा देणें हेंच कादंबरीकाराचें खरें कर्तव्य आहे अशा तऱ्हेचीं प्रेमचंदांचीं मतें होतीं हें सर्व उद्बोधन कलेच्या पातळीवरून करण्याचा सफल-असफल प्रयत्न प्रेमचंदांनीं प्रथम केला हें त्यांचें मोठेपणच मानलें जावें.

१९१८ ते १९३६ पर्यंतचें कादंबरीवाङ्मय प्रेमचंदांच्याच छायेखालीं निर्माण झालें व वाढलें. सामान्यपणें त्यावेळचा सारा समाज प्रेमचंदांच्या कादंबऱ्यांतून चित्रित केला गेला आहे. प्रेमचंदांच्या कादंबऱ्या म्हणजे तत्कालीन सामाजिक आणि राजकीय परिस्थितींचीं प्रतिबिंबेंच आहेत. शेतकरी, मजूर, शूद्र इत्यादि उपेक्षित दलित वर्ग, जमीनदार, सावकार, पण्डे-पुरोहित, इत्यादि शोषक वर्ग आणि दुर्बळ त्रिशंकु मध्यमवर्ग या सर्व थरांचें वर्णन अत्यंत सूक्ष्म निरीक्षण आणि प्रगाढ सहानुभूति यांच्या सहाय्यानें मोठ्या तन्मयतेनें प्रेमचंदांनीं केलें आहे. वर्ण-संघर्ष, वर्ग-संघर्ष, स्वार्थ-संघर्ष यांचीं विविध रूपें त्यांनीं रंगविलीं. सरकार आणि जनता यांच्या संघर्षाचें वर्णन करून सरकारची भीषण शासनव्यवस्था आणि निरपराध जनतेचें असहाय्यपण व्यक्त करून सरकारबद्दल क्रोध आणि जनतेबद्दल करुणेची भावना निर्माण करण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. या दृष्टीनें त्या काळच्या राष्ट्रवादी विचारसरणीनें त्यांच्यावर खूपच पगडा बसवला होता असें म्हटलें पाहिजे. वेश्या, विधवा, निराश्रिता, परित्यक्ता शिक्षिता इत्यादि स्त्रीजीवनाचीं विविध चित्रें रंगवून त्यांच्या विशिष्ट समस्यांकडे लक्ष वेधण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. स्त्रीजीवनावर तसेंच भारतीय शिक्षित वर्गावर पश्चिमी संस्कृतीचे होणारे नुकसानकारक परिणाम त्यांनीं आवर्जून सांगितले. अर्थात् पाश्चात्य संस्कृतीचें वैचारिक दृष्ट्या संपूर्ण आकलन त्यांना झालें होतें असें नाहीं. संयुक्त-कुटुंबपद्धतीची छिन्नभिन्नता पाहून त्यांचें भावनाशील हृदय कळवळलें. बेकारी, व्यक्तित्वाचा अंत इत्यादि यंत्रयुगाचे दुष्परिणाम पाहून त्यांनीं यंत्राविरुद्ध आवाज उठविला. राष्ट्रीय विचारांच्या दृष्टीनें ते जेवढे काळाबरोबर जात होते तेवढे सामाजिक विचारांच्या दृष्टीनें त्यांना जातां आलें नाहीं हें सत्य आज मान्य व्हायला हरकत नसावी. मात्र प्रतिभाशाली लेखकावरहि परिस्थितीच्या शृंखलांचा परिणाम होतो हें मान्य केलें तर प्रेमचंदांच्या मर्यादाकडे सहानुभूतीनें पाहायला हरकत नाहीं.











प्रेमचंदांचा मोठेपणा हा कीं जीवन-दर्शनाचा हा प्रयत्न आकर्षक कथानकें आणि सजीव पात्रें यांच्या माध्यमांतूनच करायला हवा हें त्यांनीं जाणलें आणि थोडेंफार यशहि मिळवलें. त्यांचीं पात्रें जिवंत वाटतात पण स्वतंत्र व्यक्तित्वानें युक्त अशीं रसरसलेलीं वाटत नाहींत — प्रतिनिधि पात्रें म्हणूनच तीं निर्माण झालीं. प्रेमचंदांची दुसरी मोठी मर्यादा म्हणजे त्यांचा आदर्शवाद, 'गोदान' अपवाद म्हणून वगळतां इतर कोणत्याहि कादंबरींत त्यांना कथा शेवटपर्यंत वास्तवाच्या पातळीवर ठेवतां आली नाहीं. त्यांचा आदर्शवाद हा स्वप्नपूर्तीच्या प्रयासासारखा स्वप्नाळू आहे. – यथार्थवादांतून सहजपणें अंकुरित झाला आहे असें वाटत नाहीं. यथार्थ किंवा वास्तववाद एक शैली म्हणूनच उपयोगांत आणला गेला. जीवनाचा व्यापक विस्तार पहाणाऱ्या ह्या कलावंताचा त्यांच्या लाडक्या आदर्शवादाच्या कल्पनेनें गळाच दाबला असें म्हणावें लागेल.

त्यांनीं व्यक्तीकडे समाजाचा एक अंश या भावनेनेंच पाहिलें. त्यामुळें व्यक्तीचें स्वतंत्र, समाजनिरपेक्ष असें रूप त्यांनीं रंगविलेंच नाहीं. तरीहि धर्म, ईश्वर, प्रारब्ध इत्यादि जुन्या मूल्यांच्या पकडींतून सामान्य माणसाला सोडविण्याचा त्यांचा प्रयत्न स्तुत्य म्हणावा लागेल. समाजाचा व्यक्तीवरचा अधिकार मान्य करूनहि वेश्या, विधवा, शूद्र, मजूर, शेतकरी समाजाचीं हीं हीनावस्थेंत असणारीं अंगें त्यांनीं समाजापुढें मांडण्याचा प्रयत्न केला – त्यांच्याकडे समाजाची दृष्टि वळविली. येथें एक गोष्ट आवर्जून सांगाविशी वाटते कीं समाजांतील विविध थरांचें हें अवलोकन प्रेमचंदांनीं सखोलतेनें केलें आणि तितक्याच यथातथ्यत्वानें व्यक्तहि केलें. केवळ विस्तार वाढविण्याची उपरी कल्पना त्यांच्यापाशीं नव्हती.

प्रेमचंदांची अंतिम कृति 'गोदान' त्यांच्या वाङ्मय विषयक दृष्टिकोणांमध्यें बदल घडल्याची साक्ष आहे. या कृतींत त्यांच्या मनावरचा आदर्शवादी कल्पनेचा प्रभाव गळून गेल्यासारखा दिसतो. आदर्शवादी भावुकतेचा परित्याग करून यथार्थवाद शैली म्हणून नव्हे तर तत्त्व म्हणून त्यांनीं स्वीकारला आहे असें दिसतें. कलाकाराला आवश्यक असें ताटस्थ्य किंवा अलिप्ततहि यांत त्यांनी साधली आहे प्रेमचंदांच्या वाङ्मयीन विकासाचा विचार करतां एक गोष्ट अतिशय लागून राहाते आणि ती म्हणजे वाङ्मयबाह्य अशा शक्तींशी संघर्ष करून जेव्हां त्यांच्यांतल्या कलावंतानें आवश्यक ती स्वतंत्रता प्राप्त करून घेतली तेव्हांच त्यांचा मृत्यु व्हावा ! मृत्युसमयीं त्यांचें वयहि फारसें नव्हतें !

**कवि प्रसाद**

'आदर्शोन्मुख यथार्थ' हें प्रेमचंदांच्या कादंबरीतील वास्तवाचें स्वरूप होतें. प्रेमचदांच्या काळांतले किती तरी छोटे बडे लेखक आदर्शाभिमुख वास्तव रंगविण्याचा आपापल्यापरी प्रयत्न करीत होते. या समन्वयी प्रवृत्तीचा फोलपणा प्रथम उघडा केला तो कवि प्रसाद यांनीं. त्यांच्या 'कंकाल' कादंबरीचें विशिष्ट असें स्थान हिंदी वाङ्मयांत आहे. धार्मिक आणि सामाजिक निर्बंधांच्या जाचाखालीं गुदमरणाऱ्या व्यक्तीच्या विद्रोहाची ही व्यंग्यपूर्ण कथा आहे. समाज-निरपेक्ष व्यक्तीचें महत्त्व उद्घोषित करणारी ही पहिली कादंबरी असून सुधारणेची मलमपट्टी कशी व्यर्थ आहे हें प्रामुख्यानें दिग्दर्शित केलें आहे. वास्तवतेचें अनावृत्त स्वरूप व्यक्त केलें आहे. काम-प्रवृत्तीचें निरोधन करणाऱ्या किंवा तिचें महत्त्व नाकारणाऱ्या धार्मिक आणि सामाजिक बंधनांचा भीषण घातकीपणा व्यक्त केला आहे. मात्र असें करतांना तिचें स्वरूप असामाजिक मात्र वाटत नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याच्या नांवाखालीं अनिर्बंधतेचें तत्त्व प्रस्थापित करूं पहाणारी अति व्यक्तिवादी किंवा आस्थाहीन कलाकृति आहे असें म्हणतां येणार नाहीं. मनुष्याच्या महानतेवरचा विश्वास अचल आहे. पण व्यक्तीची बुद्धि, सुखदुःखाच्या व्यक्तिगत कल्पना यांना न जुमानणाऱ्या मनुष्यकृत बंधनांवर मात्र त्यांचा विश्वास नाहीं.

आपली मनुष्यावरची ही निष्ठा किंवा आस्था अधिक सखोलपणें त्यांनीं व्यक्त केली असती तर ही त्यांची कृति अमर ठरली असती. या कृतींत त्यांची पुष्कळशी शक्ति बेड्या तोडण्यांतच खर्च झाली. सामाजिक प्रश्नांचें निदान करतांना प्रेमचंदांनीं अनाथ, विधवा, वेश्या, परित्यक्ता यांच्यासाठीं जे आश्रम आपल्या साहित्यांतून थाटले त्यांचें बेगडी आणि पोकळ स्वरूप व्यक्त करण्यांत प्रसादजींची अधिक शक्ति खर्च झाली. घटना आणि पात्रांच्या बाहुल्यामुळें त्यांच्यांत रंग भरायला त्यांना सवडच सांपडली नाहीं. त्यामुळें व्यक्तिरेखा निर्माण करण्याचें कसब प्रेमचंदांपेक्षा कांकणभर ज्यास्त असतां-



अनुक्रमणिका

नाहि त्याचा उपयोग करून घेतां आला नाहीं असेंच म्हणावें लागतें. कथावस्तूची घडण योगायोगावर आधारलेली असली तर कादंबरी जविनाची अनुकृति वाटत नाहीं– विश्वसनीयता कमी होते हें त्यांनीं लक्षांत घेतलें नाहीं. अनैतिक संबंधांतूनच निर्माण झालेल्या पात्रांचा हा मेळावा पाहिल्यावर कादंबरीकाराची दृष्टि अत्यधिक एकांगी वाटते आणि वास्तवाभास कमी होतो. तेवढीं सहानुभूतीहि लेखक मिळवूं शकत नाहीं. ऐतिहासिक आणि रोमॅंटिक वातावरणांतच रमणारा हा आनंदवादी नाटककार किंवा अधिक खऱ्या अर्थानें कवि वास्तवतेचें इतकें भेदक दर्शन करूं शकतो हें कौतुकच म्हटलें पाहिजे. नंतरच्या ' तितली ' कादंबरींत मात्र आदर्शोन्मुख यथार्थवादाकडेच कादंबरीकाराचा कल दिसतो.

प्रसादजींची ही अनावृत वास्तववादी प्रवृत्ति एका वेगळ्या रूपांमध्यें त्यांच्या आधीच हिंदी साहित्यांत दिसून येत होती. कंकाल १९२९ मध्यें प्रकाशित झाली. 'दिल्ली का दलाल,' ' चंद दसीनोंके खतूत ' 'बधुआ की बेटी ' ' शराबी ' इत्यादि उग्रजींच्या कादंबऱ्या त्यापूर्वीच प्रकाशित झाल्या होत्या. श्री. चतुरसेन शास्त्री यांची ' व्यभिचार ' हि प्रकाशित झाली होती. अशा तऱ्हेच्या कादंबऱ्यांना ' घासलेटी साहित्य ' असें समजण्यांत येऊं लागलें. वास्तवतेच्या नांवाखालीं वासनांना उत्तेजित करणारें हें वाङ्मय खूपच लोकप्रिय झालें. मनुष्य पशूच्या रूपांत चित्रित करण्यांत आला. त्याच्या फक्त दोनच भुका–अर्थ आणि त्याहिपेक्षा प्रबळ काम. या कादंबऱ्या वाचतांना सारखें वाटत रहातें – मनुष्याचा पशुप्रवृत्तींपासून मुक्तता करून घेण्याचा प्रयास निरर्थकच झाला आहे असें या लेखकांना वाटत असावें. वाईट एवढेंच वाटतें कीं, ' उग्र ' सारख्या प्रतिभावंत लेखकाची आणि भाषा-प्रभूची शक्ति मदिरालय, गुंडालय, वेश्यालय यांतच गुंतून राहिली. नाहींतर हिंदी साहित्यांत एक महान् लेखकाची भर पडली असती !

## जैनेंद्रकुमार व मनोविज्ञानाचा प्रभाव

आतांपर्यंत उल्लेखलेल्या कादंबरीकारांची प्रवृत्ति ही बहिर्मुखी होती अन्तर्मुखी नव्हे. आदर्शवादी, यथार्थवादी, घोरयथार्थवादी या लेखकांनीं मनुष्याचें जें रूप चित्रित केलें तें समाजाच्या संदर्भात–सामाजिक परिस्थितीच्या चौकटींत जेवढें करतां आलें तेवढेंच. या पात्रांची गति किंवा क्रिया समाज किंवा समूह यांच्याशीं झालेल्या संघर्षांतूनच निश्चित होत होती. त्यांची प्रतिक्रियाहि समाजावर अंकित होत होती. माणसाचें प्रकट किंवा चेतन मनच व्यक्त होत होतें. मनुष्याच्या अवचेतन किंवा अन्तर्मनाचें ज्ञान फारसें यांच्यापाशी नव्हतें. मनुष्याची क्रिया–प्रतिक्रिया किंवा त्याची निर्णयशक्ति यांच्यावर प्रभुत्व गाजवणारी किंवा दिशा देणारी अन्तश्चेतना प्रसाद, प्रेमचंद यांच्या साहित्यांत फारशी व्यक्त झाली नाहीं. माणसाच्या कार्य–व्यापाराची निर्णायिका अशी जी अन्तश्चेतना तिच्या शक्तीचें स्वरूप त्यानंतरच अधिक व्यक्त झालें. जैनेंद्रकुमार यांनीं १९२९ मध्येंच ' परख ' लिहिली आणि अन्तर्मनाची थोडी झलक दाखविण्याचा प्रयत्न केला. परंतु जैनेंद्रावर फ्राईड, एडलर, युंग या पाश्चात्य विचारवंताचा प्रत्यक्ष असा प्रभाव पडला असें म्हणतां येत नाहीं. आपल्या पात्रांच्या तरल मनोवेगांचें किंवा मनाच्या सूक्ष्म थराचें कलात्मक ( वास्तवाच्या नांवाखालीं कृत्रिम यथातथ्यत्वानें नव्हे ) आविष्करण त्यांनीं आपल्या प्रतिभेच्या मंगदुरावरच केलें – कोणत्याहि पुस्तकी सिद्धान्तांनीं भारावून जावून नव्हे. माणसाच्या अन्तश्चेतनेचें शास्त्रीय विवरण केलें तें इलाचंद्र जोशी यांनीं. अज्ञेयांनीं ( वात्सायन ) त्याचा योग्य उपयोग करून आपल्या कादंबऱ्या कलात्मक दृष्टीनें अति सुंदर बनवल्या.

प्रेमचंदांच्याच काळांत त्यांच्यापेक्षां अगदीं वेगळ्या मार्गावरून वाटचाल केली जैनेंद्रकुमारांनीं. भगवतीचरण वर्मा यांनीं ' चित्रलेखा ' लिहून एक वेगळीच प्रवृत्ति प्रकाशांत आणली. जैनेंद्रकुमारांची ' परख ' १९३० मध्यें प्रकाशित झाली आणि वर्माजींची ' चित्रलेखा ' १९३४ मध्यें. प्रेमचंदांनीं परंपरागत नैतिक कल्पनांची विद्रोही भूमिकेवरून चिरफाड कधींच केली नाहीं किंवा नैतिक प्रश्नाची तत्वचर्चा करण्याचाहि प्रयत्न केला नाहीं. वर्माजीनीं 'चित्रलेखा-' मध्यें पाप काय आणि पुण्य काय या प्रश्नावर कादंबरी लिहून तात्विक किंवा दार्शनिक कादंबरीची नवी प्रथा निर्माण केली. परंतु त्याचा फारसा विकास हिंदीमध्यें झाला नाहीं ( जैनेंद्र वृत्तीनें दार्शनिक असले तरी त्यांच्या कादंबऱ्या तात्विक आहेत असें म्हणतां येणार नाहीं ). चित्रलेखा ही नर्तिका कुमारागिरी या निवृत्ति-



अनुक्रमणिका






मार्गी माणसाच्या संयत, दमित वासनांना जागृत करते आणि तो शेवटपर्यंत पतित होतो. उलट भोगी आणि प्रवृत्तिमार्गी बीजगुप्त शेवटीं मनाची क्षमाशीलता आणि स्वस्थता दाखवतो. पाप आणि पुण्य अशा कांहीं गोष्टी नसून सर्व परिस्थिति माणसाच्या कर्माकर्माला कारण असते असा निष्कर्ष काढला आहे. वर्माजींनीं पाप-पुण्याचा प्रश्न समाधानकारकपणें सोडविला आहे असें मात्र म्हणतां येत नाहीं. पाप-पुण्यापेक्षांहि प्रवृत्ति-निवृत्ति हाच प्रश्न त्यांनीं मांडला आहे असें वाटतें. पाप-पुण्य परिस्थितिसापेक्ष मानून आपला मूळ प्रश्नच त्यांनीं डावलला आहे असें वाटतें. नंददुलारे वाजपेयी यांनीं म्हटल्याप्रमाणें शेवटीं ही कादंबरी तात्त्विक न होता मनोवैज्ञानिक झाली आहे. परंतु यांतल्या तत्त्व-चर्चेनें पात्रांना ठोकळेबाजपणा आला नाहीं हें नमूद करायला हवें. आणि प्रथमच या कादंबरींत प्रस्थापित नैतिक मतांना थोडा हादरा देण्याचा प्रयत्न केला आहे.

'परख' लिहून जैनेंद्रांनीं प्रेमचंदापेक्षा वेगळा मार्ग अनुसरला हें वर म्हटलेंच आहे. जैनेंद्रांवर जेवढी उलट सुलट टीका झाली तेवढी कुणावर झाली नाहीं हें त्यांच्या मोठेपणाचें लक्षण मानतां येईल. तंत्राच्या दृष्टीनेंहि 'परख' हिंदी साहित्यांत महत्त्वाची आहे. घटनाप्रधान, पात्रबहुल अशा वास्तवाच्या व्यावहारिक पातळीवरून लिहिलेल्या प्रेमचंदांच्या कादंबऱ्यांशीं अगदीं विरोधी मार्ग जैनेंद्रांनीं चोखाळला आणि प्रेमचंदांकडूनहि प्रशस्तिपत्रक मिळवलें! जैनेंद्रांचीं पात्रें संख्येनें कमी आणि मध्यमवर्गा-तलींच आहेत. पण विस्ताराची उणीव जैनेंद्रांनीं चरित्रलेखनांतला सखोलपणा आणि आकर्षण यांनीं भरून काढली. पात्रांच्या भावावेगांचें उत्कट संवाहन करू शकणाऱ्या त्यांच्या भाषाशैलीची प्रेमचंदांकडूनहि दाद घेतली गेली! एकहि प्रसंग, पात्र किंवा वाक्य त्यांनीं आवश्यकता नसतांना घातलें नाहीं. सूचकता किंवा व्यंजना यांचा खरा वापर केला त्यांनींच. प्रेम-चंदांच्या प्रमाणें नानाविध आर्थिक, सामाजिक समस्यांचें चित्रण करण्याचा मोह सोडून जैनेंद्रांनीं साधा-रणपणें फक्त विवाहित स्त्रीचें परपुरुषाविषयींचें आक-र्षण हाच विषय पुष्कळशा कादंबऱ्यांतून घेतला. तोहि समस्या म्हणून नव्हे -- विषयवस्तु म्हणून हें लक्षांत ठेवलें पाहिजे. (प्रत्येक कृतीकडे समस्यामूलक कृति म्हणून पहाण्याच्या हिंदी टीकाकारांच्या पूर्वग्रही दृष्टी-मुळें जैनेंद्रांवर तसेंच इतरांवर खूपच अन्याय झालेला आहे.) विधवेची दमनीय अवस्था पाहून प्रेमचंदजी व्याकुळ झाले होते. आणि त्यांनीं आपल्यापरी मार्गहि सुचविले. परंतु विधवेच्या मनांतील उदात्त प्रेमाचें उत्कट आविष्करण केलें जैनेंद्रांनींच. 'परख' मध्यें, कादंबरीकडे समस्यामूलक कादंबरी म्हणून पाहिलें कीं समस्येचें केलेलें 'समाधान' हि विचित्र वाटतें. विवा-हित स्त्रीचें परपुरुषाकडे आकर्षित झालेलें मन प्रेम-चंदांना अकल्पनीय नाहीं तरी घृणास्पद वाटलें असतें; कारण त्यांची परंपरागत विवाहसंस्थेवर आणि नारीच्या पातिव्रत्याच्या कल्पनांवर निष्ठाच होती. पण जैनेंद्रांच्या कादंबऱ्यांचें तें एक खास आकर्षण आहे. सुनीता, सुखदा, विवर्त, व्यतीत या कादंबऱ्यांत नायि-केचें पतिव्रता-धर्म आणि प्रेम यांच्यांतलें द्वन्द्व रंगविलें आहे. मात्र त्यांनीं सामाजिक दृष्ट्या गर्हणीय अशा प्रेमाचें जें निष्कलंक किंवा उदात्त चित्रण केलें तें त्यांच्या उदार मानवतावादी विचारांचें आणि नैतिक विचारांच्या सूक्ष्मतेचें फळ आहे. यांचे नायक असा-मान्य--नायिका असामान्य आणि मानसिक द्वंद्वाचें 'समाधान' करण्याची त्यांची पद्धतिहि असामान्य वाटते. सामाजिक दृष्ट्या स्खलनशील नायिकांबद्दलहि करुणा आणि सहानुभूति जागविणें हें कलावंताच्या श्रेष्ठ प्रतिभेचें लक्षण आहे असें मला वाटतें आणि त्यांत ते यशस्वी झाले आहेत. विशेष म्हणजे त्यांचे खलपुरुष- (कीं प्रतिनायक?) हि खल नसतात--मान-सिक कुठेनें युक्त असले तरी इमानदार असतात. नायकहि निष्क्रिय नसतात. (नंद दुलारे वाजपेयी हे हिंदी मधले एक महान् टीकाकार व पंडित आहेत -- त्यांनीं जैनेंद्रांवर खूपच आरोप केले आहेत. वाजपेयींचा अधिकार मान्य करूनहि आणि त्यांच्याबद्दल आदर ठेवूनहि त्यांचीं जैनेंद्राबद्दलचीं मतें भ्रामक वाटतात). ते वाजपेयींच्या म्हणण्याप्रमाणें नपुंसकहि नाहींत. त्यांची अपार सहानुभूति, दुःख गिळण्याची सहिष्णुता इतकी शक्तिशाली असते कीं त्यामुळेंच त्यांच्या नायिकांमध्यें मानसिक द्वंद्व निर्माण होतें आणि शेवटीं त्यांचा बचावहि होतो. (जैनेंद्रांची मितव्ययता आणि व्यंजनेनें सूचित करण्याच्या सूक्ष्म



अनुक्रमणिका








कौशल्यामुळेंहि त्यांच्यावर खूप अवास्तव टीका होत असावी असें वाटतें. ) नंददुलारे वाजपेयी जेव्हां त्यांना नपुंसक म्हणतात तेव्हां नायकांच्या पौरुषाबद्दल त्यांची काय कल्पना आहे हेंच कळत नाहीं. पत्नी दुसऱ्याकडे आकर्षित झाली आहे, हें लक्षांत आल्यावर मध्ययुगांतल्या नायकाप्रमाणें लत्ताप्रहरांनीं तिला वठणीवर आणण्यांतच 'पौरुष' असेल तर जैनेंद्रांचे नायक तसे नाहींत हें मान्य. जैनेंद्रांच्या नामकांमधला अभिजात सुसंस्कृतपणा लक्षांत घेतला कीं त्यांच्या वागणुकींतला स्वाभाविकपणा लक्षांत यायला हरकत नाहीं. परंतु एवढें सगळें असलें तरी जैनेंद्रांच्या कादंबऱ्यांना श्रेष्ठ साहित्यांत स्थान मिळेल का याविषयीं शंका वाटते. याचें कारण काय असावें ? त्यांची सूक्ष्म आध्यात्मिक आदर्शवादिता. त्यांच्या आदर्शवादाचें स्वरूप आपण त्यांच्याच शब्दांत पाहूं या– "जें आमच्या मधल्या रुद्ध वेदनेला, पिंजरबद्ध भावनांना रूप देऊन आकाशांतील प्रकाशांत मुक्त करीत नाहीं, ज्यांत आपल्या 'स्व' चें सेवन नव्हे आणि 'दान' नाहीं तें साहित्यच नव्हे. साहित्याचें लक्षण रस, रस म्हणजे प्रेम. प्रेम अहंकाराचा उत्सर्ग – हृदयाचा उत्सर्ग अधिक स्थायी असतो. याहिपेक्षां आपल्या सर्वस्वाचा उत्सर्ग, सर्वस्व-समर्पण हें अधिक स्थायी तत्त्व." या आदर्शवादाचा परिणाम असा होतो कीं, त्यांचीं पात्रें शेवटीं जैनेंद्राच्या कल्पनेप्रमाणें फिरतात. एकाच उडींत त्यांच्या नायिका हें सर्वस्व समर्पण करतात- ( वाचकाची झेंप त्यांच्याबरोबर जाऊं शकत नाहीं; कारण त्यांची अचानक उडी मारण्याची पद्धत त्यांच्या स्वभावाशीं चमत्कारिक वाटते– शेवटपर्यंत वाचकाला बरोबर घेऊन जाणारी नायिका त्याला फसवून कशी झेंप टाकते हें कळतच नाहीं ! या गोष्टीची कारण-मीमांसा त्याला करतां येत नाहीं ). नायक पहिल्यापासूनच 'पहुँचे हुए'–– सिद्ध. प्रतिनायक शेवटीं संन्यास तरी घेतात किंवा जेलमध्यें जातात. वाचकांना द्रवित करण्याची अपार शक्ति जैनेंद्रांमध्यें आहे यांत संशय नाहीं. परंतु बुद्धिवादाचा विरोध ( बुद्धि की दुष्मनी ) करण्याची कल्पना सोडून कलाकार या नात्यानें गांधी-प्रणीत सूक्ष्म आदर्शवादापासून आपली मुक्तता करून घेतील तर त्यांच्या कादंबऱ्यांत एक बौद्धिक स्पष्टता येईल आणि जमिनीवर चालणारीं–फिरणारीं त्यांचीं पात्रें भावुकतेनें आकाशांत उड्डाणें करण्याचें सोडून देतील व जीवन-रसानें रसरसलेलीं व विश्वासार्ह वाटतील. जैनेंद्र व प्रेमचंद दोघांच्याहि मनांत मानवाबद्दल अपार सहानुभूति आहे-पण आदर्शवादानें त्यांना दोघांनाहि खूप गुदमरवून टाकलें असें म्हणणें भाग आहे.

## त्याच परंपरेंतील इलाचंद्र जोशी

व्यक्तिवादी अन्तर्मुखी कादंबरीची जैनेंद्रांनीं प्रवर्तित केलेली प्रथा इलाचंद्र जोशी यांनीं विशेष उत्साहानें पुढें चालवली. जैनेंद्रांची अन्तर्मुखता, व्यक्तींच्या मनोवेगांचें तरल चित्रण त्यांच्या प्रतिभेचा स्वाभाविक आविष्कार होता. १९३५ च्या मानानें हिंदी साहित्यामध्यें एक नवी चेतना निर्माण झाली. पहिल्या महायुद्धानंतरच विश्वसंपर्क प्रस्थापित करायला हवा याची जाणीव हिंदी लेखकांना होऊं लागली होती. परंतु त्या दृष्टीनें खरी पावलें १९३० नंतरच पडूं लागलीं. त्याचा परिणाम म्हणजे पाश्चात्य तत्त्वज्ञान आणि पाश्चात्य साहित्य याची अधिक गंभीरपणें दखल घेतली जाऊं लागली. राजकीय क्षेत्रांत मार्क्सवादाचें आगमन १९२० पासूनच होऊं लागलें होतें. गांधीजींच्या अहिंसक राजकारणाची प्रतिक्रिया म्हणून आणि रशियन राज्यक्रांतीच्या तत्कालीन यशस्वितेचा प्रभाव म्हणून तरुण मन या वादाकडे ओढलें जाऊं लागलें. साहित्यांत त्याचा प्रभाव सुमारें १९३५ च्या दरम्यानें दिसूं लागला. फ्राईडचा मौनवाद आणि मार्क्सचा समाजवाद यांचा जबरदस्त प्रभाव हिंदी साहित्यावर पडला. काम आणि अर्थ यांना जीवनांत आत्यंतिक महत्त्व देणाऱ्या या विचारधारा भारतीय संस्कृतीशीं मूलतःच विसंवादी होत्या. या नव्या विचारांनीं भारतीय संस्कृतीच्या मोठेपणाविषयींच प्रश्नचिन्ह उपस्थित केलें. त्या आधींच विकट वास्तवाच्या जाणीवेनें प्राचीन संस्कृतीच्या महत्तेविषयीं आणि भारतीय जीवनमूल्यांविषयीं साशंक झालेल्या तरुण मनाला फ्राईड आणि मार्क्स यांनीं बौद्धिक आधार दिल्यामुळें कांहीं काळ तरुण मनावर त्याची धुंदीच चढल्यासारखी झाली असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं ! या सर्वांचीं प्रतिबिंबें हिंदी साहित्यांत आढळतात. प्रेमचंदांच्या

स्वप्नाळू आदर्शवादाचें मायाजाळ नाहींसें झालें होतें ( खुद्द त्यांच्याहि डोळ्यावरून ). गांधीवादी प्रभाव नष्ट करण्यांत मार्क्सवादी किंवा समाजवादी विचारसरणीनें खूपच यश मिळविलें होतें. हिंदी काव्यांतला छायावाद ( आणि रहस्यवाद ) गांधीप्रणीत जीवनमूल्यांनीं आणि भारतीय संस्कृतीच्या महत्तेनें प्रभावित झाला होता. त्याच्या विनाशाचा काळ १९३५ हाच. जीवनांतील वास्तवतेचें उघडें नागडें स्वरूप पहाण्यासाठीं या गोष्टी आवश्यक होत्या. फ्राईडच्या यौवनवादानें माणसाला आपल्या कामवृत्तीचा विचार निस्संकोचपणें करण्याची आणि तिचें महत्त्व ओळखण्याची शक्ति दिली, या विचारसरणींनीं साहित्यिकांना परंपरागत धार्मिक, नैतिक, सांस्कृतिक निर्बंधांपासून मुक्त करण्याचा प्रयत्न केला. या वेळीं वस्तुतः बंध-मुक्त साहित्य-कृति निर्माण होण्यासारखी योग्य परिस्थिति होती. परंतु तसें झालें नाहीं– कारण फ्राईडवाद आणि मार्क्सवाद यांनींच कांहीं बंधनें साहित्यिकांवर घातलीं– प्राकृतिक सत्य या नांवाखालीं. किंवा ऐतिहासिक जबाबदारी या नांवाखालीं : या दोन्हीं मतवादांचा पुरस्कार करणाऱ्या साहित्यिकांमध्यें तज्जनित दोषहि आले असल्यास आश्चर्य नाहीं. परिणाम असा झाला कीं एक तर साहित्याचा एक नवा संप्रदायच बनला आणि दुसरें म्हणजे मनाच्या खोल गुहेंत भटकतां भटकतां वास्तविकतेच्या नांवाखालीं खरें जगच साहित्यिक विसरून गेला. ही खोल गुहाच त्याची दुनिया झाली.

इलाचंद्र जोशीनीं १९४१ मध्यें ' संन्यासी ' लिहून मनोविश्लेषणात्मक कादंबरीचें प्रवर्तन केलें. जैनेंद्रांपासून ही प्रवृत्ति वेगळी. इलाचंद्रांनीं मनाचें विश्लेषण केलें खरें पण मनाला एक वस्तू मानून – मनाचें वस्तुनिष्ठ असें शास्त्रीय विश्लेषणच त्यांनीं केलें– कधीं तर अन्तर्मनाविषयींचे सिद्धांतच स्पष्ट करण्यासाठीं कादंबऱ्यांची उभारणी ते करतात असें वाटूं लागतें. संशय, द्वेष, सूड, प्रेम, पूर्वार्जित संस्कारांचा प्रबळपणा इत्यादि मानसिक प्रवृत्तींचें विश्लेषण हिंदीमध्यें प्रथम अत्यंत सूक्ष्मपणानें आणि विस्तारानें त्यांनींच केलें. त्यांना लोकप्रियताहि लाभली पण एखाद्या डोस्टोव्हस्की सारख्या प्रतिभाशाली लेखकाची शक्ति त्यांच्या कादंबऱ्यांमध्यें आढळत नाहीं. मनुष्याच्या मनांतल्या दमित वासनांची, संयमित अभिलाषांची आणि त्यामुळें उत्पन्न झालेल्या विकृतींचीं चित्रणें करतांना माणसाचा आत्मा किंवा त्याची स्वयंनिर्णयाची विवेकशक्ति याची दखल त्यांनीं घेतली नाहीं. मनुष्यांतील विकृतींचींच अतिवास्तवाच्या पातळीवरील चित्रणें हीं खऱ्याखुऱ्या माणसाचीं नसतात. त्यांचे नायक रुग्ण मनोवृत्तीचे निर्माण झाले– त्यांना कुत्र्याप्रमाणें आपलीच शेपटी पकडण्यांत विकृत सुख मिळतें. माणसाच्या विकृति तेवढयाच यथार्थ नसून आत्मनिर्णयाची शक्ति त्याच्या विकासांतला एक महत्त्वाचा पैलू आहे हें ते विसरले. परिणाम असा झाला कीं त्यांच्या कादंबऱ्या अगदीं एकांगी– रुग्ण वाटतात. मात्र 'मुक्तिपथ' किंवा ' जहाज का पंछी ' या अलिकडच्या कादंबऱ्यांत त्यांची दृष्टि बरीचशी बदललेली दिसते हें नमूद करायला हवें. माणसाकडे पहाण्याची एक स्वस्थ ( healthy) दृष्टि प्राप्त होत आहे ही आनंदाची गोष्ट असली तरी त्यांचा माणूस जोपर्यंत प्रेमचंदांच्या माणसासारखी दुसऱ्याबद्दल आत्मीयता निर्माण करूं शकत नाहीं तो पर्यंत चांगल्या दर्जाची प्रतिभा असूनहि सशक्त कृति ते देतील किंवा काय याबद्दल शंका वाटते. तरी त्यांचें नवें वळण स्वागतार्ह आहे. नाहींतर इलाचंद्र जोशींचें स्थान एक प्रयोगकर्ता किंवा शैलीकार एवढेंच राहील.

## यशपाल व मार्क्सवाद

मार्क्सवादाच्या प्रभावानें जें साहित्य निर्माण झालें त्याला प्रगतिवादी साहित्य समजलें जातें. यशपाल हे प्रमुख कादंबरीकार. यशपाल यांच्या प्रतिभेविषयीं संशय असण्याचें कारण नाहीं आणि ही प्रतिभा त्यांच्या लघुकथांतून प्रामुख्यानें प्रकट झालेली आढळते. कादंबऱ्यांतून मात्र मार्क्सवादी सिद्धान्तांचा प्रचार करण्याचा आणि मार्क्सविरोधी विचारांवर हल्ले चढविण्याचा चंगच बांधलेला दिसतो. कधीं संशय असाहि येतो कीं, यशपाल व्यक्त करीत असलेले विचार हे मार्क्सचे प्रामाणिक विचार आहेत काय ? तसें असेल तर ते विचार विकृत आहेत असेंच म्हटलें पाहिजे. या विचारसरणींतला प्रमुख दोष म्हणजे मानवी विवेकावर किंवा आत्मशक्तीवर यांचाहि विश्वास नाहीं. व्यक्ति समाजाचें एक अंग आणि आर्थिक वा इतर परिस्थितींतून निर्माण



अनुक्रमणिका

झालेली अशी समजूत. त्यामुळें व्यक्तीच्या गुणदोषांचें विवेचन आणि व्यक्तित्वाचें मूल्यमापन सामाजिक दृष्टीतूनच व्हायचें. मनुष्याचें वैयक्तिक रूप यांच्या पुढें उभारतच नाहीं. अपरिहार्यतः व्यक्ति वर्गीय बनूनच चित्रित होते. हें झालें सामान्य तत्त्वज्ञान– साहित्यांत व्यक्तित्वच निर्माण होत नाहीं. धर्म, ईश्वर, परंपरा यांचीं बंधनें झुगारून देणाऱ्या प्रगतिवादी साहित्यिकांचें वाङ्मय शेवटीं असें सांप्रदायिकच झालें– मग तो संप्रदाय नवा असो किंवा ऐतिहासिक अनिवार्यता म्हणून येवो. यशपालच्या कादंबऱ्यांवर याचा फारच परिणाम झाला. त्यांचीं पात्रें विचार व्यक्त करतात साम्यवादी पण आचार मात्र करतात प्रवाहपतिताप्रमाणें. खूप वेळा काम-प्रेरित होऊनच यशपाल यांचा स्त्री-पुरुष-विषयक दृष्टिकोण पहाण्यासारखा आहे. त्यांच्या ' दिव्या ' कादंबरीतला मारिश यशपालच्या विचारांचं प्रतिनिधित्व करणारें पात्र असावें ( साधारणपणें कादंबरींतील पात्रांचे विचार कादंबरीकाराचे असतातच असें नाहीं–पुष्कळवेळा नसतात हें मान्य असून सुद्धां वरील विधान जाणीवपूर्वक केलेलें आहे ). मारिश एक दगड तासून नारीरूप आणि नारी -आकर्षण यांचें विवेचन करतो, लेखकाचें वर्णनच पहा- " शिला खण्ड का नीचे और ऊपर का भाग अछूता था। केवल मध्यमें दक्षिण के आधे भागमें जैसे गवाक्ष खोलकर नारीका पार्श्वपूर्ण यौवनसे उन्नत एक स्तन और त्रिबलीपर भीतर झुक, कटिपर वर्तुलमें फैल उदर दिखाई दे रहा था।" –रत्नप्रभाने कहा, " आयुष्मन मेरे मतमें यह नारी का अंग मात्र है, पूर्ण नहीं।" – मारिश बोला, " देवीका कथन उचित है। परंतु यही अंग नारीत्व की सार्थकता के लिये पुरुष को आव्हान करता है और फिर उस फलीभूत सार्थकता का पोषण करता है। यही नारी है देवी।" स्त्री विषयीचा हा विकृत आदरहीन दृष्टिकोण त्यांच्या कादंबऱ्यांतून व्यक्त झाला "मनुष्य के रूप" मधली सोमा, 'दादा कामरेड' मधली 'शैला', 'देशद्रोही' मधल्या नायिका याच रूपांत चित्रित झाल्या. दर प्रकरणांत आलेल्या लैंगिक किंवा अश्लील प्रसंगांविषयीं कांहीं म्हणायचें नाहीं. त्याहिपेक्षां त्यांचीं मनुष्याचीं रूपें चुकीचीं आहेत. पूर्वग्रहदूषित आहेत याचें वाईट वाटतें. जीवनाच्या अनेक अंगांची यशपाल यांना चांगलीच माहिती आहे. वर्णन करण्याची त्यांची हातोटी हिंदीमध्यें फारच थोड्या लेखकांना मिळाली आहे. व्यंग्य, उपहास, उपरोध करण्याची जबर शक्ति त्यांच्या लेखणींत आहे. जीवनाचा विस्तार, मजुरांच्या बद्दल सहानुभूति, शोषकांची निंदा, गैर मार्क्सवाद्यांची उडवलेली योग्य–अयोग्य थट्टा, राजकारण हें सर्व आहे – पण तें आरोपित ( imposed ) आहे, कादंबरीच्या मूळ घाटासाठीं त्यांची आवश्यकता नाहीं असं वाटतें. मनुष्यावर लादल्या गेलेल्या आर्थिक, नैतिक बंधनांवर प्रहार करतांना यशपाल विसरतात कीं मानवतेवरहि ते व्यंग्य करतात आणि कधीं माणसाला पशु जवळ आणून बसवतात.

नागार्जुन, अमृतराय, रांगेय राघव, राहुल सांकृत्यायन इत्यादि कादंबरीकार या पंथातले आहेत.

या प्रवृत्तीच्या समानान्तर परंतु सांप्रदायिक वैशिष्ट्यांपासून अलिप्त राहून, मनुष्याच्या मूळ रूपाबद्दल श्रद्धा ठेवून लिहिणाऱ्या कादंबरीकारांमध्यें उपेंद्रनाथ 'अश्क' यांचें नांव लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. सूक्ष्म निरीक्षण व छोटया तपशीलास प्रसंग-चित्राप्रमाणें रेखाटण्याची कला, सामाजिक विषमतेला बळी पडलेल्या व्यक्तीबद्दल आकर्षण, चरित्रचित्रणासाठीं लागणारी अन्तरभेदिनी तीव्र दृष्टि हीं त्यांचीं वैशिष्ट्यें सांगतां येतील. 'गिरती दिवारें' आणि 'गर्म राख' ह्या त्यांच्या ख्यातिप्राप्त कादंबऱ्या. प्रेमचंदांची अपार मानवीय सहानुभूति त्यांच्यापाशीं असती तर हिंदींतील सर्वश्रेष्ठ उपन्यासकार होण्याची पात्रता त्यांच्यापाशीं आहे.

आतांपर्यंतच्या कादंबरीकारांची माणसाकडे पहाण्याची दृष्टि सांप्रदायिक तरी होती किंवा रुग्णद. प्रेमचंद आणि जैनेंद्र यांच्यावर आदर्शवादाचा रंग चढलेला. एखाद्यांत पूर्वग्रह रहित साहित्य निर्माण करण्याची शक्ति असलीच तर मानवतेबद्दल सखोल आत्मीयता तरी तोकडी पडते. हिंदीचें पुष्कळसें साहित्य हें साहित्यबाह्य अशा वादांनीं दूषित झालेलें ! धर्म, समाज, परम्परा, पोथीप्रामाण्य इत्यादि कालकवलित परंतु मृत शरीराच्या घाणीसारखीं दुर्गंधि पसरवणारीं मूल्यें हिंदी लेखकांनीं फेंकून देण्याचा आपआपल्यापरी प्रयत्न केला होता. अशावेळीं नवीन मूल्यांच्या शोधासाठीं धडपडणारा व्यक्तित्ववान् नायक निर्माण



अनुक्रमणिका






होण्याची आवश्यकता होती. हें व्यक्तित्व निर्माण करण्याचा प्रयत्न केला अज्ञेय (वात्सायन) यांनी शेखरच्या रूपांत. शेखर धर्म, समाज, ईश्वर सर्वांच्या विरुद्ध आहे हें अर्ध-सत्य। हिंदी टीकाकारांनीं याच विशेषाकडे आवर्जून लक्ष वेधलें– कधीं कौतुकानें तर कधीं कुत्सितपणानें. शेखरच्या व्यक्तित्वाचा दुसरा पैलू ध्यानांत घेतलेला माझ्या वाचनांत आला नाहीं.) शेखरचें सर्वांत मोठें वैशिष्ट्य हें कीं त्याचा विद्रोह विद्रोहासाठींच नसतो चेतनाहीन, जड जीवनमूल्यांच्या शृंखला तोडून नवीन चैतन्यशील मूल्यांनीं युक्त असें आपलें व्यक्तित्व घडावें– अशा नव्या माणसाच्या निर्मितीची सृजनपीडा त्याच्यामध्यें शेवटपर्यंत आढळते. सामान्यतः समाजावर, धर्मावर केलेले कठोर आघात ज्या तऱ्हेचें अहंकाराला पोषक असें सुख देतात तसें सुखहि कादंबरी वाचतांना होत नाहीं. (असे आघात वाचकांत पुष्कळवेळां आपल्या कल्पनापूर्तीचा आनंद देऊन त्याच्या सुप्त अहंकाराला पुष्ट करत असतात– कारण आजचा सर्वच वाचकवर्ग प्रस्थापित अवस्थेमध्यें असंतुष्ट असतो आणि प्रत्यक्ष सामना करण्याचें सामर्थ्य त्याच्या पाशीं नसतें). प्रत्येक ठिकाणीं अश्रूंचे प्रवाह निर्माण करून सहानुभूति जागविण्याचा प्रयत्नहि अज्ञेय करीत नाहींत. सबंध कादंबरी वाचतांना एक गंभीर करुणेनें मन व्याप्त होतें- ही करुणा अधिक स्थायी असते. प्रत्येक प्रस्थापित मतापुढें प्रश्नचिन्ह निर्माण करण्याची बौद्धिक प्रखरता, मानवाबद्दल सक्रिय सहानुभूति, विचार आणि आचार यांत सामंजस्य निर्माण करण्याची प्रामाणिक धडपड, व्यक्तिनिर्विशेष बौद्धिक घृणा, वेदनेचें विष पिण्याची निळकंठी सहिष्णुता आणि यासर्वांबरोबर आपलें व्यक्तिमत्त्व विकसित करण्याची एक बौद्धिक जबाबदारी जाणून जीवनांत चाललेला संघर्ष – या वैशिष्ट्यांनीं निर्माण केलेलें शेखरचें जिवन्त व्यक्तित्व हिंदी साहित्यांतील चाळीस वर्षांच्या साधनेचें फळ आहे शेखरचा आगामी तिसरा भाग अज्ञेयांच्या मौलिक प्रतिभेचें आणि परिश्रमांचें परिपक्व फळ असेल. कारण शशीच्या प्रेमाचें, श्रद्धेचें, व्यक्तित्वाचें खत त्याच्या व्यक्तित्वाच्या समृद्धिकरतां घातलें आहे — अपेक्षा वाढल्या तर तें स्वाभाविकच आहे. पण या अपेक्षा अज्ञेय पुऱ्या करूं शकतील काय?

## अज्ञेय शेखर : एक जीवनी

शेखर : एक जीवनी हिंदी कादंबरीतला एक परमबिंदु आहे. 'नदी के द्वीप' मध्यें अज्ञेय तिथपर्यंत पोहोचूं शकले नाहींत. 'नदी के द्वीप' एक दर्दभरी प्रेमकहाणी आहे. आणि हें दुःख उत्कटतेनें व्यक्त करण्यांत अज्ञेय यशस्वी झाले आहेत. पण तें दुःख पिऊन त्याच्या साहाय्यानं त्याच्यावर उठण्यांनी आणि जीवनांत आस्था टिकवून ठेवण्याची कल्पना किंवा दुःखानें स्वतःला उज्ज्वल करण्याची कल्पना या कादंबरीला एक वेगळी ओजस्विता देते. आपली जबाबदारी स्वीकारण्याची भुवनची आकांक्षा (रेखा या विवाहित परंतु वैवाहिक जीवनांत असंतुष्ट असलेल्या स्त्रीशीं संबंध प्रस्थापित झाल्यामुळें त्यांतून निर्माण झालेला प्रश्न आणि आलेली जबाबदारी) आणि दुसऱ्याचें व्यक्तित्व बांधून 'सेक्युरिटी' प्राप्त करण्याची रेखाची अनिच्छा त्यांच्या व्यक्तित्वांना एका उच्च पातळीवर घेऊन जाते. "मैंने तुमसे प्यार मांगा था: तुम्हारा भविष्य नहीं मांगा था, न मैं वह लूंगी।" ही भावना रेखाला परंपरागत नायिकापासून एका वेगळ्याच रूपांत व्यक्त करते. भुवनची विवाहाची मागणी ती नाकारते कारण ती परिस्थितिमुळें आलेली असते– तिच्या मातृत्वाच्या प्रश्नांतून आलेली असते. "जो हुआ है वह न हुआ होता तो– तुम न माँगते, न कहते; इस लिये तुम्हारा कहना परिणाम है। और यह कहना परिणाम नहीं कारण होना चाहिये, तभी मान्य तभी उसपर विचार हो सकता है।" स्त्रीचा हा आत्माभिमान व कसोटीच्या वेळीं तिनें केलेला हा आत्मनिर्णय 'रेखा'च्या व्यक्तित्वाला हिंदी साहित्यांत एक नवी – डायमेन्शन प्राप्त करून देतो असें मला वाटतें.

अज्ञेयानंतर अनेक कादंबरीकार आले. विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्यांना धुंद बनवण्याच्या आकर्षणशक्तीनें युक्त, शराबी शैलींत लिहिलेली 'गुनाहों का देवता' सारखी धर्मवीर भारतीची कादंबरी अधिक लोकप्रियता प्राप्त करू शकली. तर कधीं नवीन प्रयोगामुळें कादंबरीला स्थान प्राप्त झालें. धर्मवीर भारती, राजेंद्र यादव हे आगामी काळांतील कादंबरीकार आहेत त्यांच्याकडे रसिकांचे डोळे लागले आहेत.

व्यक्तिप्रधान कादंबरींत 'शेखर : एक जीवनी' प्रकाशस्तंभ मानला जाईल त्याचप्रमाणें प्रेमचंद पद्ध-

तीच्या बहिर्मुख कादंबरींत अमृतलाल नागर यांची "बूँद और समुद्र" गौरव-चिन्ह समजली जावी. लेखकाच्याच शब्दांत "अपने देश के मध्यम वर्गीय नागरिक समाजका गुणदोष भरा चित्र" असें या कादंबरीचें स्वरूप सांगतां येईल. पण समाजाच्या चित्रणापेक्षांहि लेखकानें व्यक्तित्ववान् पात्रांची केलेली निर्मिति महत्त्वाची मानली जाईल. पात्रबहुल अशा या कादंबरींतलें प्रत्येक पात्र एक वेगळेपणा घेऊन येतें आणि आपला छाप उठवून निघून जातें. ताई, महिपाल, कर्नल, रामजी बाबा, सज्जन, कल्याणी, नवकला इत्यादि पात्रें लेखकाच्या मनुष्यस्वभावाच्या अद्भुत ज्ञानाचीं उदाहरणें. मध्यमवर्गीय जीवनांत व्याप्त कुढेपणा, मानसिक अस्वास्थ्य, लाचारी, पाशविकता आणि ढोंग यांचें चित्रण करतांनाहि मानवी जीवनाबद्दल आपली आस्था लेखक कायम ठेऊं लागला. ही आस्था स्वप्नाळू आदर्शवादी नाहीं, राजकीय आशावादावर टिकलेलीहि नाहीं – माणसाच्या विवेकशक्तिवरची आस्था आहे ही. मात्र आस्थेबद्दलच्या शुष्क घोषणा नाहींत – कादंबरींतील पात्रांच्या चारित्र्यांतून सहजपणें आस्थेचे स्वर निर्माण झालेले आहेत. नाना रसांची निर्मिति, चुरचुरित उपहास, प्रासंगिक विनोद इत्यादि वैशिष्ट्यांनीं किंचित् शिथिल असलेली ही कादंबरी आकर्षक झाली आहे.

हिंदी कादंबरीच्या इतिहासांत 'गोदान' एक मोठा प्रेरणाबिंदू आहे. हिंदी कादंबरींतील प्रादेशिक कादंबऱ्यांना प्रेरणा मिळाली 'गोदान' मुळेंच. नागार्जुन यांनीं 'बलचनमा', 'नयी पौध', दुखमोचन' इत्यादि कादंबऱ्यांतून मिथिला गांवाचें चित्रण केलें आहे. या दृष्टीनें अतिशय सफळ प्रयत्न केला फणीश्वरनाथ 'रेणु' यांनीं. मिथिला मधील गांवांचें लोकजीवन 'मैला आँचल' आणि 'परती परिकथा' यांतून चित्रित केलें आहे. या कादंबऱ्यांचें वैशिष्ट्य म्हणजे लोकभाषा, लोकगीतें, लोकनृत्यें, आणि त्याच बरोबर लोकांच्या पातळीवरचे सर्व व्यवहार यांनीं सबंध गांवच जिवंत केला आहे. येथें एका व्यक्तीला प्राधान्य नाहीं. ज्याचें त्याचें स्थान त्याच्या लोकजीवनांतल्या प्रत्यक्ष व्यवहारांतून निश्चित व्हायचें. स्वातंत्र्योत्तर काळांतली रचनात्मक प्रेरणा या कादंबऱ्यांतून मूर्तिमान झाली आहे. प्रादेशिक कादंबऱ्यांत 'मैला आँचल' प्रयोग आणि आशय दोन्हीं दृष्टींनीं श्रेष्ठ ठरावी.

हिंदी कादंबरीकारांनीं नवीन प्रयोगांकडेहि आपलें लक्ष द्यावयाला सुरवात केली आहे. धर्मवीर भारतीची 'सूरज का सातवाँ घोडा', नागार्जुन यांची 'बेटसानाथ', शिवप्रसाद मिश्र 'रुद्र' यांची 'बहती गंगा' अज्ञेयांची 'शेखर : एक जीवनी' गिरधर गोपाळ यांची 'चाँदनी के खणुहर' प्रभाकर माचवे यांची 'परन्तु' ह्या कादंबऱ्या शिल्पाच्या दृष्टीनें उल्लेखनीय आहेत. शिल्प आणि वस्तु दोन्हीं दृष्टीनी मौलिक अशी कादंबरी "बाणभट्ट की आत्मकथा" - हजारी प्रसाद द्विवेदी यांची.

"बाणभट्ट की आत्मकथा" मध्यें प्रारंभीच लेखकानें सत्याभास निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे कीं, आत्मकथेची हस्तलिखित प्रत त्यांना एका वृद्धेजवळ मिळाली आणि त्याचेंच हिंदी रूपान्तर त्यांनीं केलें. बाणभट्टाच्या समासप्रचुर, अलंकृत, काव्यात्मक शैली सारखीच शैली त्यांनीं वापरली. मध्ययुगीन वातावरण निर्माण करण्यासाठीं त्या वेळच्या रीतिरिवाजांचें, भाषेचें, अभिवादनादि छोट्या मोठ्या व्यापारांचें, पोषाख, अलंकार इत्यादि गोष्टींचें सूक्ष्म अध्ययन करून त्यांचा योग्य वापर केला आहे. 'कादंबरी' आणि 'हर्षचरित्'यांत विखुरलेली बाणभट्टाविषयींची माहिती घेऊन त्यावर कल्पनेचा साज चढवून ही कल्पनारम्य कादंबरी रचली आहे. मात्र मध्ययुगांतील कांहीं समजुतींना आजच्या वास्तवाचा निकष लावूनच पहायचें ही कल्पना सोडल्यास ही कादंबरी पूर्णपणें वास्तव आहे असें म्हटलें पाहिजे. निडनिया, भट्टिनी आणि बाणभट्ट यांच्या उज्ज्वल व्यक्तिरेखा हें तर कादंबरीचें वैशिष्ट्य आहेच. पण त्याशिवायहि परस्परांविषयींच्या नाजुक प्रेमभावना इतक्या हळुवारपणें आणि उत्कटतेनें चित्रित केलेल्या आहेत कीं कादंबरीचें तें एक खास आकर्षण आहे. ज्यावेळीं स्त्रीकडे भोग्यवस्तु या दृष्टीनें पाहून (कळत तर कधीं नकळत) प्रेमाच्या नांवावर वासनांचीं भडक चित्रें पुष्कळवेळा वाचावयाला मिळतात त्यावेळीं अशा एखाद्याच कादंबरीतलें स्त्रीच्या शरीराला पवित्र मंदिर मानून केलेलें भौतिक परंतु उदात्त, निष्कलुष उत्कट प्रेम-चित्रण अत्यंत हृदयस्पर्शी वाटलें तर नवल नाहीं.








## ऐतिहासिक कादंबऱ्या

हिंदी कादंबरीमध्यें ऐतिहासिक कादंबऱ्याहि विपुल आहेत. वृंदावनलाल वर्मा यांची 'गढ़ कुण्डार', 'विराग की पद्मिनी', 'झाँसी की रानी', चतुरसेन शास्त्री यांची 'वैशालीकी नगरवधू' रांगेय राघव यांची 'मुर्दों का टीला' या उल्लेखनीय ऐतिहासिक कादंबऱ्या. परंतु एकंदरींत ऐतिहासिक कादंबऱ्यांचें भवितव्य संदिग्धच वाटतें. साहस, शृंगार इत्यादि रोमँटिक भावनांची परिपूर्ति सामाजिक किंवा रहस्यमय कादंबऱ्यांतूनहि होतेच. शिवाय आजच्या माणसाच्या विविध समस्या इतक्या भयंकर झाल्या आहेत कीं प्राचीन किंवा ऐतिहासिक वातावरणांत तन्मय होण्यासाठीं तो वेळहि काढूं शकत नाहीं आणि तशी आवडहि राहिली नसावी. आजचा माणूस अधिकाधिक सामयिक (Contemporary) बनत आहे. भारतीय संस्कृतिकडे सुद्धां प्रश्नांकित दृष्टीनें पाहूं लागला आहे. तेव्हां सांस्कृतिक उत्थापनाची ललकारी घेऊन आलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्यांविषयीं तो उदासीनच आहे. यापुढें 'बाणभट्ट की आत्मकथा' सारख्या अभिजात (Classical) कादंबऱ्याच वाचल्या जातील—अशी कादंबरी ऐतिहासिक कादंबरीकारांना निर्माण करतां आली नाहीं.

हिंदी कादंबरीच्या या प्रवृत्यात्मक सर्वेक्षणांतून अनेक गोष्टी सिद्ध होतात. कलावंत प्रथम कलावंत असावा आणि नंतर समाजसुधारक किंवा कोणताहि 'वादी'. याचा अर्थ 'कला वाद' मान्य आहे असें नव्हे. खरा कलावंत जीवनाच्या खतांतूनच साहित्य निर्माण करतो; पण कोणत्याहि वादाचा चष्मा घेऊन आल्यावर त्याच्या समर्थनासाठीं पुष्कळवेळां त्याला आपल्या कथेला किंवा पात्रांना अशीं वळणें द्यावीं लागतात कीं तें सर्व अस्वाभाविक किंवा अप्राकृतिक वाटतें या दृष्टीनें अज्ञेयांचें मत विचारणीय आहे. त्यांनीं कुठेंतरी लिहिलें आहे कीं सुधारणा, क्रांति यांचें क्षेत्र कादंबरी होऊं शकत नाहीं—कादंबरीकाराचें व्यक्तित्व हें त्यांचें क्षेत्र. व्यक्तित्व संपन्न करण्याचा प्रयत्न हेंच कलावंताचें प्रमुख कर्तव्य—या समृद्धींतून कादंबरीमध्यें समृद्धता येते. नाहीं तर सगळे वाद आणि सगळीं दर्शनें आरोपित (Imposed) होतात. व्यक्तित्वाची ही समृद्धि जीवनाबद्दलच्या आस्थेंतच संभवते. प्रेमचंदांच्या उदण्ड मानवतेचें रहस्य हेंच आहे. कादंबरीकार जीवनवीर असावा तो या दृष्टीनें. प्रयोगांचें महत्त्व आहेच. पण ही प्रयोगाची प्रेरणा जितकी आन्तरिक तितकी सफलता अधिक. 'मैला आँचल'च्या सफलतेचें रहस्य नव्या प्रयोगाची आन्तरिक प्रेरणा. हिंदी कादंबरीकार सामान्याच्या, क्षुद्राच्या भावनांबद्दल फारच जागरूक आहे—असें हि म्हणावें कीं, हिंदीच्या सर्व साहित्यांतून उपेक्षित, पीडित, आहत यांचे स्वरच अधिक घुमतात. परंतु सामान्याबरोबर उचाला, असामान्यालाहि स्थान द्यायला हरकत नाहीं. कारण मानवता सर्वांतच असते आणि सर्वांमधल्या मानवतेचें आकलन कलावंतानें केलें तरच त्याच्या साहित्यांत व्यापकपणा येईल. 'नदी के द्वीप' मध्यें उच्चवर्गीय लोकांचें दुःख व्यक्त झालें म्हणून त्या कादंबरीचें महत्त्व किंवा त्या दुःखाचें दुःखत्व कमी कां व्हावें तें कळत नाहीं. (पुष्कळ टीकाकारांनीं अशी टीका केली आहे). हिंदी कादंबरींतल्या व्यंग्य (satire) प्रणालीबद्दलहि थोडें लिहिलें पाहिजे. कारण तें आज फारच सवंग झालें आहे. व्यंग्य करणारा माणूस दुसऱ्याबरोबर स्वतःलाहि काटतो आहे याची जाणीव ठेवायला हवी. ज्यांच्यावर व्यंग्य केलं जातें त्यांच्यांत व्यक्ति म्हणून कादंबरीकारहि येतो. खरें म्हणजे व्यंग्य करण्याचा अधिकार त्यालाच आहे जो दुःख खऱ्या अर्थानें भोगतो (कदाचित् त्यावेळीं तो व्यंग्य करणारहि नाहीं— आणि व्यंग्यात्मकतेनें साहित्याला महात्मता येते असेंहि नाहीं).

हिंदी कादंबरीमध्यें वास्तवतेचें भेदक दर्शन कमी नाहीं — कमतरता आहे तो या वास्तवतेंत जगणाऱ्या व्यक्तित्वाची (म्हणूनच वास्तवता कधीं कादंबरीकाराची वास्तवता न रहातां इतकी उपरी म्हणून कादंबरींत वावरते की कादंबरीला स्वरूप येतें माहितीनें भरलेल्या पुस्तकांचें). प्रयोगाकरता प्रयोग योग्य नसेल तरी त्यांचीहि आवश्यकता आहेच. नव्या क्षेत्रांच्या अन्वेषणांतूनच एखादा असा कादंबरीकार निर्माण होतो कीं, जुन्यांचे प्रयोग आणि नवीं क्षेत्रें तो आत्मसात् करून त्या जोरावर पुढें जातो. अनेक नव्या क्षेत्रांत काम व्हायला हवें आहे. बालकांच्या मनोवृत्तीविषयीं हिंदी कादंबरी वाचनांत आलेली नाहीं. भांडवलदारांच्या मनोविश्वांत कुणीहि अवगाहन केलेलें नाहीं. गुन्हेगारांचें

मनोविश्व, यंत्रांचे प्रयोग करण्याचें विश्व, राजकीय व सामाजिक क्षेत्रांत काम करणाऱ्या महान् व्यक्तींचें मनोविश्व, विश्वसंचार करणाऱ्या प्रवाशांचें मन — कितीतरी विश्वें हिंदी कादंबरीकाराला अजून धुंडाळायचीं आहेत. प्रतिभा आणि अभ्यास यांच्या सहाय्यानें निर्माण झालेल्या या विषयांवरच्या कादंबऱ्या कधीं वाचावयास मिळतील ? पण हें सर्व करतांना स्वतःच्या व्यक्तित्वाची मूसच अशी बनवायला हवी कीं या नव्या क्षेत्राचें, नव्या जीवनाचें आविष्करण त्यांतून स्वाभाविकपणेंच अंकुरित व्हावें — कलाकार या नात्यानें हिंदी कादंबरीकारांची प्रमुख समस्या हीच आहे.

---














# सुलभता व एकसूत्रता यासाठीं मेट्रिक पद्धतीचा वापर करा.




## मेट्रिक वजनें : रूपांतर कोष्टक

### किलोग्रॅमचे शेर

| किलोग्रॅम | मण | शेर | तोळे निकटतम तोळा |
|---|---|---|---|
| १ | — | १ | ६ |
| २ | — | २ | ११ |
| ५ | — | ५ | २९ |
| १० | — | १० | ५७ |
| २० | — | २१ | ३५ |
| ५० | १ | १३ | ४७ |
| १ क्वीन्टल | २ | २७ | — |
| (१०० किलोग्रॅम) | — | | |

### किलोग्रॅमचे पौंड

| किलोग्रॅम | पौंड | औंस |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| २ | ४ | ७ |
| ५ | ११ | ० |
| १० | २२ | १ |
| २० | ४४ | १ |
| ५० | ११० | ४ |
| १ क्वीन्टल (१०० किलोग्रॅम) | २२० | ७ |

**१ किलोग्रॅम = १,००० ग्रॅम**

प्रकाशन संचालक, महाराष्ट्र सरकार मुंबई.



अनुक्रमणिका

प्रा. म. गं. नातू

# सुधारक चुकले काय ?

वैचारिक स्थित्यंतराची प्रक्रिया कांहींशी आंदोलनात्मक असते. म्हणजे तिच्यांत एकाच दिशेनें सतत वाटचाल होत नसून अनेकदां प्रगतीच्या अवस्थेनंतर परागतीची अवस्था येते. अंकगणितांतील काळकामवेगाच्या उदाहरणांतील पालीप्रमाणें दोन पावलें पुढें व एक पाऊल मागें असें तिचें स्वरूप असतें. महाराष्ट्रांतील विवेकाधिष्ठित सुधारणेचा गेल्या सवाशे वर्षांचा इतिहास अशाच स्वरूपाचा आहे. या सुधारणेचें शिंग बाळशास्त्री जांभेकरांनी १८४० मध्यें फुंकलें. त्यानंतर लोकहितवादी, जोतिबा फुले, रानडे इत्यादि थोर पुरुषांनी स्थितिप्रिय समाजाच्या प्रखर विरोधाला धैर्यानें तोंड देऊन सुधारणेचें कार्य बरेंच पुढें नेलें; आणि एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस सुधारकाग्रणी आगरकरांनी सुधारणेचें मूलगामी व सांगोपांग विवेचन करून तिचें संपूर्ण विवेकवादी व स्वातंत्र्यवादी असें सामाजिक तत्त्वज्ञान तयार केलें व त्यास आपल्या शुद्ध चारित्र्यानें, निर्विवाद सामाजिक कळकळीनें, आणि कुशल व तिखट लेखणीनें मोठी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. त्यानंतर हें कार्य केशवसुत, हरि नारायण आपटे, कोल्हटकर, वा. म. जोशी, गडकरी, वरेरकर इत्यादींनी आपल्या साहित्याद्वारें चालू ठेवलें. ह्या काळांत एकंदरीनें सुधारणेचें पाऊल मंद गतीनें कां होईना पुढेंच पडत गेलें असें दिसतें.

परंतु गेल्या कांहीं वर्षांत सुधारणेच्या गतीस बरीच मोठी ओहोटी लागल्याचें दिसत आहे. सुधारणाविरोधी सनातनी किंवा स्थितिप्रिय शक्तींना बराच जोर चढला असून सुधारकांची हेटाळणी, त्यांचा उपहास प्रतिष्ठित व्यक्तींकडून होऊं लागला आहे. सुधारकांचा मार्ग चुकला होता, ते परप्रत्ययनेय होते, ते स्वजनद्रोही होते अशा तऱ्हेची ओरड पुनः सुरू झालेली आहे. अशावेळीं सुधारणाप्रेमी लोकांनी वेळींच जागें होऊन विरोधकांचे हल्ले परतविणें फार अगत्याचें झालें आहे. हे हल्ले जुनेच आहेत, आणि त्यांना सुधारकांनी समर्पक उत्तरेंहि देऊन ठेवलीं आहेत. परंतु सुधारकांचें साहित्य आज लोकांसमोर नाहीं. अशा स्थितींत त्यांच्यापुढें जर नुसतेच सुधारणाविरोधी विचार येत गेले तर त्यांची दिशाभूल होणें अपरिहार्य आहे. याकरितां सुधारणेचें वास्तव स्वरूप काय आहे ? सुधारकांना अभिप्रेत असलेली सुधारणा काय होती ? विरोधक म्हणतात त्याप्रमाणें अलीकडचा इतिहास व शास्त्रीय ज्ञान यांत सुधारकांच्या तत्त्वज्ञानास बाधक असे नवीन पुरावे सांपडले आहेत काय ? नवीन सनातन्यांच्या आक्षेपांत नवीन कांहीं आहे काय ? इत्यादि प्रश्नांचा विचार करून सुधारकांच्या तत्त्वज्ञानाचें व कार्याचें फिरून एकदां समर्थन करणें अत्यावश्यक झालें आहे.

हें विवेचन दुसऱ्याहि एका दृष्टीनें महत्त्वाचें आहे. समाजांत नेहमीच आरामप्रिय आणि संतुष्ट लोकांचा असा एक वर्ग असतो कीं ज्याला सुधारणा आणि तिला विरोध करणें या दोन्ही गोष्टी सारख्याच कटकटीच्या आणि त्रासदायक वाटतात. या वर्गांतील लोक सुधारणेला जरी सक्रिय विरोध करीत नसले तरी तिच्याकरिता कोणी जिवाचा आटापिटा कां करावा हें त्यांना कळत नाहीं. काळानें सर्व इष्ट आपोआप साधणार आहेच, तेव्हां विनाकारण कलह

कशास ? अशी या वर्गाची विचारसरणी असते. या वर्गातील लोक आज असें प्रतिपादीत आहेत कीं सुधारकांनी पुरस्कारलेल्या सर्व सुधारणा आज झालेल्याच आहेत, तेव्हां आतां सुधारणावादाचें प्रयोजन राहिलेलें नाहीं. सुधारणेच्या समर्थन करीत असतांना ह्या वर्गाकडेहि आपण दुर्लक्ष करून चालणार नाहीं. कारण हा वर्ग जरी उघडपणें सुधारणाविरोधी नसला तरी त्याची विचारसरणी लोकांच्या वैचारिक आलस्यास पोषक होत असल्यामुळें त्याच्याहिकडून तिला मोठाच विरोध होतो. यास्तव याहि वर्गाच्या विचारसरणीचा समाचार घेणें आवश्यक आहे.

सुधारकांनी सुचविलेल्या सुधारणा अनेकांगी होत्या. त्यांपैकी फक्त एकाच अंगाचा–स्त्रीविषयक सुधारणेचा–विचार करण्याचें या लेखांत योजिलें आहे. या अंगासंबंधानें वर सांगितल्याप्रमाणें दोन प्रश्नांचा विचार येथें करावयाचा आहे. ( १ ) सुधारक चुकले काय ? ( २ ) सुधारकांचें कार्य संपलें काय ?

परंतु या प्रश्नांना प्रत्यक्ष हात घालण्यापूर्वीं एक महत्त्वाची गोष्ट स्पष्ट करणें अवश्य आहे. ती ही कीं सुधारक व स्थितिप्रिय यांचे सामाजिक हिताविषयींचे दृष्टिकोण सर्वस्वीं भिन्न आहेत. त्यांच्या विचारसरणींतील पहिला मूलभूत विरोध असा आहे कीं स्थितिप्रियांना जुनें हें केवळ जुनें म्हणूनच पूज्य व रक्षणीय वाटतें, आणि त्यामुळ नवीन आचारविचारांना त्यांचा कडवा विरोध असतो; परंतु अशा प्रकारचें पुरातनाचें माहात्म्य सुधारकांस मान्य नसून कोणत्याहि आचारविचाराची इष्टानिष्टता – मग तो जुना असो वा नवा असो, आपला असो किंवा परकीय असो – विवेकानेच निश्चित केली पाहिजे असा त्यांचा आग्रह असतो. या दोन विचारसरणींतील दुसरा महत्त्वाचा भेद व्यक्ति व समाज यांच्या [illegible]विषयींच्या कल्पनेंत आहे. सुधारक सामान्[illegible] वादी असतात, तर सनातनी बहुधा स[illegible] सलेले आढळतात. व्यक्तिवादी विचारसरणीनुसार समाजांतील स्पृश्य, अस्पृश्य, मजूर, भांडवलदार, स्त्री, पुरुष इत्यादि घटकांऐवजीं प्रत्येक व्यक्तीला स्वतःचें म्हणून एक स्वतंत्र मूल्य आहे. प्रत्येकास स्वतंत्र महत्त्व आहे. म्हणून कोणत्याहि कारणाकरितां एखाद्या व्यक्तीचा दुसऱ्या एखाद्या व्यक्तीचें किंवा समाजाचें केवळ साधन म्हणून उपयोग करणें अन्यायाचें आहे. प्रत्येकास आपल्या इच्छेप्रमाणें आपला विकास करण्याची संधि देणें यांतच समाजाच्या खऱ्या हिताची शक्यता आहे. याच्या उलट समष्टिवादी लोकांना समाजाच्या ‘ हिता’करितां व्यक्तींना केवळ साधन म्हणून वागवणें व त्याकरितां त्यांचें वा त्यांच्या समूहाचें प्रसंगी बलिदानहि करणें यांत कांहींच गैर वाटत नाहीं. मानवाच्या इतिहासाकडे पाहिल्यास सत्ताधिकारी व समर्थ वर्ग समाजहिताच्या गोंडस नांवाखाली दुर्बलांचा साधन म्हणून सर्रास उपयोग करून घेत असल्याचें स्पष्ट दिसतें. अस्पृश्यांनी स्पृश्यांची सेवा करणें, मजुरांनी भांडवलदारांसाठी राबणें, स्त्रीनें कुटुंबासाठी स्वतःस चार भिंतींत कोंडून घेणें–यांत केवळ समाजाचेंच कल्याण आहे असें नाहीं, तर त्या त्या वर्गाचेंहि खरें कल्याण आहे असें ते प्रतिपादीत आले आहेत. ह्या दोन विचारसरणी याप्रमाणे सर्वथा भिन्न असल्यामुळें त्यांच्या पुरस्कर्त्यांत विचारविनिमय देखील केवळ अशक्य आहे. यास्तव या लेखानें सुधारणाविरोधी लोकांचें मतपरिवर्तन होईल अशी आशा व्यर्थ आहे. परंतु ज्यांच्या मनाचीं द्वारें बंद झालेलीं नाहीत अशा लोकांशीं विचारविनिमय शक्य असल्यामुळें त्यांना उद्देशूनच हा लेख लिहिला आहे.

(२)

‘ सुधारक चुकले ’ असें प्रतिपादणाऱ्या विरोधकांचे प्रमुख आक्षेप पुढीलप्रमाणे आहेत.

( १ ) स्त्रीपुरुषसमता अनैसर्गिक असल्यामुळें ती बळेंच घडविण्याचा प्रयत्न समाजास हानिकारक होईल.

( २ ) बालविवाहाचा प्रश्न जरी आज मिटला असला तरी त्याच्या जागीं त्याहून भयंकर असा प्रौढ कुमारिकांचा प्रश्न निर्माण झाला आहे.

( ३ ) स्त्रियांना मिळालेल्या स्वातंत्र्यामुळें त्या चारित्र्यहीन होत आहेत.

( ४ ) स्त्रीच्या आर्थिक स्वावलंबनाच्या खुळा-मुळें कुटुंबसंस्था खिळखिळी होत आहे; आणि कुटुंबसंस्था समाजाचा मूलाधार असल्यामुळें ती मोडल्यास समाजाचें विघटन होऊन हजारों वर्षांच्या प्रयत्नांनी निर्माण केलेली संस्कृति नष्ट होण्यास वेळ लागणार नाहीं.

या आक्षेपांचा आतां क्रमानें विचार करूं.

( १ ) स्त्री-स्वातंत्र्याच्या विरोधकांचा हा आक्षेप मोठा बिनतोड समजला जातो. कारण स्त्रीपुरुषांची समता जर अनैसर्गिक असेल, तर ती अशक्य आहे असा अभिप्राय त्यांतून निघतो, आणि एखादी सुधारणा जर अशक्य असेल तर ती कितीहि इष्ट असली तरी ती विचारबाह्यच ठरेल. या करितां या अनैसर्गिकतेच्या आक्षेपाचा कांहीशा विस्तारानें विचार करून त्यांतील हेत्वाभास सुस्पष्ट करून दाखविणें जरूर आहे.

आक्षेपकांच्या युक्तिवादांतून असा अभिप्राय व्यक्त होतो कीं स्त्रीपुरुषांच्या कर्मांची वर्तमान विभागणी ही निसर्गानेंच केलेली आहे. परंतु हा शुद्ध भ्रम आहे. स्त्रीनें घरकामें करावींत आणि पुरुषांनीं ज्ञानार्जन, अर्थार्जन करावें, कीर्ति मिळवावी, राज्यें करावींत, पराक्रम करावेत ही निसर्गाची योजना आहे असें म्हणायला कसलाहि पुरावा नाहीं. शुद्ध निसर्गसिद्ध कर्मविभागणी पाहायची असेल तर ती आपल्याला मानवेतर प्राण्यांच्या – विशेषतः कीटकांच्या – जीवनांत आढळेल. उदा० मधमाशांचे राणी, नर आणि कामकरी असे तीन वर्ग असून त्यांची शरीररचनाच अशी असते कीं त्यांपैकीं प्रत्येक वर्गातील मधमाशी फक्त एकाच प्रकारचीं कर्मे करूं शकते. राणीमाशीचें कार्य अंडीं घालणें, नराचें कार्य राणीच्या ठिकाणीं गर्भसंभव करणें, कामकरी माशा नपुंसक असून त्यांचें काम पोळें तयार करणें, मध सांठविणें, त्याचें रक्षण करणें, इत्यादि. हीं वेगवेगळीं कामें निसर्गसिद्ध आहेत असें खऱ्या अर्थानें म्हणतां येतें, कारण तीं करण्याकरितां अवश्य असलेली शारीररचना निसर्गदत्त असते. परंतु सुसंस्कृत मानवाचीं कर्में तपासून पाहिल्यास वरील अर्थानें निसर्गसिद्ध अशी खास स्त्रियांचीं आणि खास पुरुषांचीं एकदोनच वैशिष्ट्यपूर्ण कर्में आहेत असें आढळतें. उदा० पुरुषांच्या बाबतींत जनकत्व व स्त्रीच्या बाबतींत जननीत्व म्हणजे अपत्यांना जन्म देणें व त्यांचें पोषण करणें एवढींच कामें शरीररचनेमुळें वैशिष्ट्यपूर्ण व म्हणून वरील अर्थानें नैसर्गिक आहेत असें म्हणतां येईल. पुरुषांच्या आणि स्त्रियांच्या जीवनांतील शेकडों, हजारों अन्य कर्में या अर्थानें नैसर्गिक नाहींत, कारण तीं करण्यास आवश्यक असे अवयव फक्त स्त्रीच्याच किंवा फक्त पुरुषाच्याच ठिकाणीं आहेत असें नाहीं. उदा० बालसंगोपन, स्वयंपाक, धुणें इत्यादि स्त्रियांची समजलीं जाणारीं कर्में पुरुषहि करूं शकतात. तसेंच शेती, व्यापार, शिक्षण, राज्यकारभार इत्यादि पुरुषांचीं समजलीं जाणारीं कामें स्त्रियाहि करूं शकतात. तेव्हां वर्तमान समाजांतील स्त्रिया आणि पुरुष यांनी करायच्या कामांची जी वांटणी आहे ती वरील अर्थानें नैसर्गिक म्हणतां येणार नाहीं. मग आक्षेपकांच्या अनैसर्गिकतेच्या आरोपाचा अर्थ काय ?

या ठिकाणीं आक्षेपक म्हणतील कीं परंपरेनें पुरुषांचीं ठरविलेलीं कर्में स्त्रियांना मुळींच करतां येणार नाहींत असें नाहीं; मात्र तीं त्यांना नीट करतां येणार नाहींत. याच्या उलट परंपरेनें स्त्रियांचीं ठरविलेलीं कम त्यांना नीट करतां येतात. याचें कारण त्यांची भिन्न शरीररचना हें नसलें,










तरी त्यांचीं भिन्न बौद्धिक व भावनिक सामर्थ्यें हें आहे. स्त्री शरीरानें पुरुषापेक्षां दुबळी आहे, एवढेंच नव्हे तर बुद्धीनेंहि कमी आहे. तसेंच तिच्या जीवनांत विचारापेक्षां विकाराचा-भावनेचा प्रभाव अधिक असतो. आणि या त्यांच्या मानसवैधर्म्यांच्या आधारावरच त्यांचीं कर्में ठरविण्यांत आलीं आहेत.

या प्रश्नाला सुधारकांनी आजपर्यंत अनेक वेळां पुढील समर्पक उत्तर दिलें आहे. स्त्रीपुरुषांचा परंपरागत कर्मविभाग नैसर्गिक नसून तो पुरुषांच्या सत्तेंतून उद्भवलेला आहे. जीवनाचीं सर्व क्षेत्रें स्त्रियांना मोकळीं केलीं तर त्यांतहि त्या पुरुषांप्रमाणेंच पराक्रम केल्यावाचून राहणार नाहीत. आजपर्यंत त्यांनी पराक्रम केले नाहींत याचें कारण त्यांच्याजवळ सामर्थ्य नाहीं हें नसून त्यांना संधीच दिली जात नसे; आणि ज्या थोड्या सुदैवी स्त्रियांना अशी संधि मिळाली त्यांच्यापैकीं अनेक स्त्रियांनी पुरुषांच्या तथाकथित क्षेत्रांत कीर्ति संपादन केली आहे. शास्त्रीय संशोधन, साहित्य, कला इत्यादि क्षेत्रांत अनेक स्त्रियांनी पुरुषांना हेवा वाटण्यासारखी कामगिरी केली आहे. त्यांना मिळालेल्या संधि जर सर्वांना उपलब्ध झाल्या तर पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांतूनहि असामान्य पराक्रमी व्यक्ति निपजतील. या जुन्या युक्तिवादास आज सुदैवानें शास्त्रीय संशोधनाचें पाठबळ लाभलें आहे. गेल्या कांहीं वर्षांत मानसशास्त्रांत मानससामर्थ्यांचें मापन करण्याचें तंत्र उदयास आलें असून त्याच्या साह्यानें मानसशास्त्रज्ञांनी स्त्री आणि पुरुष यांचे नैसर्गिक भेद कोणते आणि परिस्थितिजन्य भेद कोणते याचा अभ्यास केला आहे. त्याचे निष्कर्ष स्त्रीस्वातंत्र्यवाद्यांना सर्वस्वीं अनुकूल असेच आहेत. हे निष्कर्ष याठिकाणीं विस्तारानें देणें अशक्य आहे, म्हणून त्यांचा सारांश तेवढा येथें दिला आहे.

शारीरिक व मानसिक कार्यें आणि इतर स्वभावविशेष यांच्या बाबतींत स्त्रीपुरुषांत पूर्वी समजला जाई त्यापेक्षां पुष्कळच कमी भेद आहे, असें अलीकडील संशोधनानें सिद्ध झालें आहे. बुद्धिनिकषांत ( Intelligence testing ) असें आढळून आलें आहे कीं जरी या परीक्षेच्या ( Test ) कांही भागांत मुलगे वरचढ असले व इतर कांही भागांत मुली वरचढ असल्या तरी संपूर्ण परीक्षेंत मात्र लिंगभेदामुळें बुद्धिसामर्थ्यांत भेद आढळून येत नाही. उदा० मुलींची गति सामान्यपणें भाषिक सामर्थ्यांत जास्त असते, तर सामान्यपणें मुलांची गति यांत्रिक व गणितात्मक सामर्थ्यांत विशेष आढळून येते. परंतु याहि ठिकाणीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, जेव्हां अमुक बाबतींत स्त्रिया पुरुषांपेक्षा कमी किंवा जास्त असतात असें आपण म्हणतों, तेव्हां हें विधान दोन **वर्गांची** तुलना करणारें असतें, **व्यक्तींची** नव्हे. म्हणजे प्रत्येक स्त्री पुरुषापेक्षां भाषिक सामर्थ्यांत वरचढ असते, किंवा प्रत्येक पुरुष स्त्रीपेक्षां यांत्रिक, गणितात्मक कार्यांत वरचढ असतो असा याचा अर्थ होत नाहीं. कारण या दोन वर्गांतील व्यक्तींत परस्परांत भरपूर भेद असतात. उदा. शारीरिक उंचीच्या बाबतींत असें दिसतें कीं पुरुष स्त्रीपेक्षा २ ते ३ इंच अधिक उंच असतो. पण याचा अर्थ प्रत्येक पुरुष प्रत्येक स्त्रीपेक्षां उंच असतो असा होत नाहीं. कारण पुरुषांच्या सरासरीपेक्षां ठेंगणीं माणसें व स्त्रियांच्या सरासरीपेक्षां उंच स्त्रिया पुष्कळ असतात. हीच गोष्ट मानसिक सामर्थ्यांसहि लागू आहे.

या दोन गोष्टी जर लक्षांत ठेवल्या तर स्त्रीपुरुषांचीं निसर्गदत्त सामर्थ्यें भिन्न आहेत म्हणून त्यांचीं कार्यक्षेत्रेंहि भिन्न आहेत, आणि स्त्रियांनी समानता मिळवून पुरुषांच्या कार्यक्षेत्रांत शिरणें अनैसर्गिक व हानिकारक आहे या आक्षेपाचा फोलपणा सिद्ध होतो. तात्पर्य स्त्रीपुरुषांचे असे कोणतेहि निसर्गदत्त

भेद नाहींत कीं, ज्यामुळें आपण त्यांचीं कार्यक्षेत्रें सर्वथा वेगळीं ठेवावीं. सर्व कार्यक्षेत्रें दोहोंनांहि मोकळीं ठेवल्यानंतर आपापल्या आवडीनुसार व सामर्थ्यानुसार स्त्री आणि पुरुष आपापलीं कार्यक्षेत्रें निवडतील, आणि यांतच त्यांच्या ठिकाणीं असणाऱ्या सुप्त शक्तींस वाव मिळेल. यांत केवळ स्त्रियाचेंच हित होईल असें नव्हे, तर सबंध समाजाचेंहि हित होईल. कारण समाजांतील एका घटकांत असलेल्या व आजपर्यंत वाया जाणाऱ्या शक्तीचा त्याला उपयोग होईल. स्त्रियांच्या ठिकाणीं जर ज्ञानार्जन, व्यावसायिक व्यवस्थापन, साहित्य-कलानिर्मिति, राज्यकारभार यांचें सामर्थ्य असेल तर त्यांस वाव न देणें व त्यांना जबरदस्तीनें गृहकृत्यांत जखडणें अन्यायाचें तर आहेच, पण एका अर्थानें तें निसर्गविरुद्ध आहे–अनैसर्गिक आहे !

( २ ) स्त्रीस्वातंत्र्यविरोधकांचा वरील अनैसर्गिकतेचा आरोप जुनाच होता. परंतु अलीकडे प्रौढ कुमारिकांच्या समस्येचा एक नवा आक्षेप ते मोठ्या हिरीरीने पुढे मांडूं लागले आहेत. या आक्षेपाचा विशेष असा आहे कीं, त्यांत स्त्रीस्वातंत्र्यविरोधकांनी आपली नेहमीची स्त्रीवर हल्ला करण्याची भूमिका सोडून वर्तमान स्त्रीच्या करुण अवस्थेने व्यथित झालेल्या हितचिंतकांची भूमिका घेतलेली दिसते. आज समाजांत वावरणाऱ्या प्रौढ कुमारिका पाहून त्यांना इतकें भडभडून येतें की आगरकर, फुले यासारख्या स्त्रियांच्या कैवाऱ्यांना सुद्धां हेवा वाटावा. ते म्हणतात कीं, बालविवाह बंद करून सुधारकांनी कुमारिकांची अवस्था विधवांच्या अवस्थेसारखी करून टाकली आहे. विवाहकालाची जुनी मर्यादा सुटल्यावर आतां ती इतकी वाढली आहे कीं त्यांना अर्धें अधिक आयुष्य अविवाहितावस्थेंतच म्हणजे अनैसर्गिक स्थितींत घालवावें लागतें. अनेकांवर तर आजन्म कुमारिका राहण्याची पाळी येते. स्वतःचा संसार थाटून जीवन परिपूर्ण करण्याऐवजीं आपल्या आईवडिलांच्या कुटुंबाचा भार वाहणें कित्येकींच्या नशीबीं येतें. शिक्षणामुळें आणि स्वातंत्र्याच्या भलत्या कल्पनांमुळें त्यांची मनोभूमिका वैवाहिक जीवनास आवश्यक अशा त्यागास प्रतिकूल होते; विवाह झाल्यावर प्रौढ वयामुळें सासरच्या मंडळीशीं त्या एकरूप होऊं शकत नाहीत व त्यामुळें त्या कौटुंबिक अस्वास्थ्यास कारणीभूत होतात. सारांश मुलींचा विवाहकाल वाढविल्यामुळें त्यांचें सर्वबाजूंनीं नुकसानच झालें आहे.

हा आक्षेप प्रथम दर्शनीं सयुक्तिक दिसतो ! परंतु त्याचा थोडा बारकाईनें विचार केल्यास त्याचें खरें स्वरूप फार वेगळें असल्याचें दिसून येईल. या आक्षेपकांची आजच्या प्रौढ कुमारिकेविषयींची कळकळ कशी मायावी आणि मतलबी आहे हें तिच्याविषयीं ते इतरत्र जी भाषा वापरतात, आणि प्रस्तुत प्रश्नावर ते जे उपाय सुचवितात त्यावरून स्पष्ट होतें. ज्या प्रौढकुमारिकेची चिंता त्यांना लागलेली दिसते तिला उद्देशून 'घोड कुमारिका', 'घोड नवऱ्या' असे अपशब्द ते सर्रास वापरतात आणि तिची यथेच्छ टवाळी करण्याची संधि दवडीत नाहींत. हीच मनोवृत्ति त्यांनी प्रस्तुत प्रश्नास सुचविलेल्या उपायांतहि उघड दिसते. हा उपाय म्हणजे पुन्हां बालविवाह-पद्धतीचा स्वीकार. प्रौढ कुमारिकांचा प्रश्न ते सांगतात तसा गंभीर आहे असें क्षणभर मानलें (तसा तो नाहीं हें पुढे दाखविलें आहे.) तरी बालविवाह ज्यांना संमत आहे त्यांची स्त्रियांच्या कल्याणाची कळवळ कोणत्या स्वरूपाची आहे याविषयीं संशय उरत नाहीं. बालविवाहाचे तोटे आज नव्यानें सांगण्याचें प्रयोजन नसावें; परंतु विरोधकांना त्यांचें सोयिस्कर विस्मरण झालेलें दिसत असल्यामुळें सुधारकांची या विषयासंबंधीची भूमिका संक्षेपानें सांगणें आवश्यक आहे. सुधारकांच्या मतें स्त्रीला पुरुषाइतकेंच स्वतंत्र व्यक्तित्व आहे आणि त्याचा विकास करण्याचा तिला पुरुषाइतकाच हक्क आहे.







तिला अल्पवयांत विवाहासारख्या आमरण टिकणाऱ्या आणि संपूर्ण जीवन व्यापणाऱ्या पाशांत जखडणें म्हणजे तिला पशूसारखें वागविणें होय. एखाद्या गायीस किंवा शेळीस विकण्यासारखा तो प्रकार आहे. अशा विवाहांतून उद्भवलेल्या कुटुंबांत स्त्रीचें स्थान दासीपेक्षा वेगळें असूं शकत नाहीं. म्हणून बालविवाहाच्या जागीं संमतितत्त्वावर आधारलेल्या प्रौढ विवाहाचा त्यांनी पुरस्कार केला. ही पार्श्वभूमि लक्षांत घेतल्यावर विरोधकांची प्रौढ कुमारिकांविषयीची चिंता स्त्रीस्वातंत्र्याच्या वैरांतूनच उद्भवलेली आहे हें स्पष्ट होतें.

आतां प्रौढ कुमारिकांच्या तथाकथित समस्येचें वास्तवस्वरूप काय आहे तें पाहूं. प्रौढ कुमारिकांची आजची स्थिति मुळीच चिंताजनक नाहीं असें कोणी म्हणणार नाहीं. परंतु विरोधकांनी तिचें रंगविलेलें चित्र मात्र अतिशय अवास्तव आणि अतिरंजित आहे. विरोधकांच्या हाकाटीवरून असें वाटावें कीं अलीकडे मुलींचीं लग्नेंच होत नाहींत. आणि घरोघर प्रौढ कुमारिका हताश होऊन जीवन कंठीत आहेत. हें चित्र किती काल्पनिक आहे तें विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. पंचवीस वर्षें वयापलीकडे किती मुलींचीं लग्नें राहतात आणि किती मुलींना आमरण कुमारिका राहावें लागतें याची मोजदाद केल्यास या दोन्ही प्रकारचीं उदाहरणें केवळ अपवादात्मक असल्याचें आढळून येईल. ही संख्या बालविवाहाच्या संख्येच्या तुलनेंत अगदीच उपेक्षणीय आहे; आणि या प्रौढ कुमारिकांचें दुःख तर हिंदू विधवेला भोगाव्या लागणाऱ्या यमयातनांच्या पासंगालाहि पुरणार नाही. परंतु प्रौढ कुमारिकांच्या दुरवस्थेनें तळमळणाऱ्या विरोधकांना विधवांच्या दुःखानें मात्र पाझर फुटत नाहीं ! हें आश्चर्य नव्हे काय ?

प्रौढ कुमारिकांची आणि प्रौढ विवाहित स्त्रियांची वास्तविक स्थिति याहून फार वेगळी आहे. प्रौढ विवाहाच्या सोयीमुळें आज मुलींचें संपूर्ण बालपण आईबापाच्या प्रेमळ छत्राखाली, भावंडांच्या सहवासांत मोकळ्या वातावरणांत किती आनंदांत जातें ! या काळांत ती बालसुलभ जीवन जगते, आपल्या भावांच्या बरोबरीनें शाळा-कॉलेजांत शिकते, आणि त्यायोगें तिचेंहि व्यक्तित्व विकसित होतें. अर्थार्जनास समर्थ होऊन जरूर पडल्यास माहेरीं व नंतर सासरीं कुटुंबाच्या चरितार्थास मदत करतां आल्यामुळें तिला समाधान आणि प्रतिष्ठा प्राप्त होतात. वराच्या निवडींत तिचा विचार घेतला जात असल्यामुळें याबाबतींत तिच्यावर सक्ती होत नाहीं. आणि तिचें कार्यक्षेत्र विस्तारलें गेल्यामुळें बहुविध कर्तृत्व करतां येऊन उच्चतर आणि व्यापक आनंदाचा लाभ तिला होतो.

तेव्हां प्रौढ कुमारिकांचा प्रश्न हा विरोधकांनी स्त्रीस्वातंत्र्याच्या मार्गांत उभें केलेलें एक बुजगावणें आहे हें वाचकांच्या लक्षांत येईल.

## ( ३ )

अलीकडे स्त्रिया चारित्र्यहीन होत चालल्या आहेत असा एक गंभीर आरोप सर्रास केला जात आहे. सीतासावित्रींचे दाखले देऊन आजच्या स्त्रीचा उपहास करणें हा संस्कृतिरक्षकांचा नित्याचा व्यवसाय होऊन बसला आहे. मुंबईसारख्या पुढारलेल्या शहरांत थेट स्त्रीसंस्थांत जाऊन "तुम्हाला समानहक्क पाहिजेत, मग गुंडांनीं धक्के मारले तर तक्रार कां करता ?" असे उद्दामपणाचे प्रश्न विचारण्यापर्यंत त्यांच्या अवहेलनेची मजल गेलेली आहे. दुःखाची गोष्ट ही कीं खुद्द स्त्रियाहि हें निमूटपणें ऐकून घेत आहेत. हा आरोप याप्रमाणें खुद्द स्त्रियांची दिशाभूल करीत असल्यामुळें त्याचा बारकाईनें विचार करणें अगत्याचें आहे.

आधुनिक स्त्रीचें चारित्र्य बिघडल्याचे आक्षेपकांचे पुरावे काय आहेत ? तर त्या भडक पोषाख करतात, पुरुषांत मोकळेपणानें मिसळतात, घटस्फो-

स्फोटास व पुनर्विवाहास त्या तयार असतात, इत्यादि. या पुराव्यांकडे पाहिलें म्हणजे आक्षेपकांना खरोखर काय खुपतें आहे त्याची स्पष्ट कल्पना येते. त्यांना प्रामुख्यानें खुपणारी गोष्ट म्हणजे आजच्या स्त्रीचें पातिव्रत्य शंभर नंबरी राहिलेलें नाहीं. ज्या-च्याशीं एकदा विवाह झाला तो कसाहि असला तरी त्याचीच सेवा करण्यांत स्त्रीच्या जीवनाची इतिकर्त-व्यता आहे, पतिनिधनानंतर तिच्या जीवनांत जगण्या-सारखें कांही उरत नाही, हें तिला पटेनासें झालें आहे, हें त्यांच्या हृदयांतील खरें शल्य आहे.

आधुनिक स्त्रीच्या दृष्टिकोणांत वर उल्लेखिलेला बदल झाला आहे ही गोष्ट खरी आहे; आणि संस्कृतिरक्षकांना त्यामुळें धक्का बसावा हेंहि स्वाभा-विक आहे. परंतु आम्हाला मात्र हा बदल सर्वथैव इष्ट वाटतो. वर प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें याबाबतींत परंपरावादी आणि सुधारक यांचे दृष्टिकोण मूलतःच भिन्न आहेत. सतीच्या अमानुष चालीची प्रशंसा करणारे सनातनी आणि स्त्रीच्या जीवनाला पुरुषा-इतकेंच स्वतंत्र मोल आहे असें मानणारे सुधारक या दोघांना परस्परांची भाषाच कळणें अशक्य आहे. कुणातरी एका पुरुषाच्या सुखाचें साधनमात्र इतकेंच स्त्रीच्या जीवनाचें सर्वस्व मानणाऱ्या संस्कृतीनें स्त्रियां-कडे धर्मरक्षणाची खडतर कामगिरी सोपवून, अर्थ व काम या पुरुषार्थांच्या संपादनाचें सुखद कार्य पुरुषां-करितां राखून ठेवावें हें स्वाभाविक आहे. या वाटणींतील भयंकर अन्याय इतका उघड आहे कीं तो संस्कृतिरक्षकांना दिसत नाहीं याचा अर्थ त्यांची दृष्टि पुरुषपक्षपातानें पूर्ण अंध झालेली आहे याहून वेगळा असूं शकत नाहीं. नीतीची मातब्बरी सुधार-कांना परंपराभिमान्यांपेक्षा कमी वाटत नाहीं; परंतु समाजांतील एका वर्गास स्वच्छंदानें वागण्यास मोकळें ठेवून दुसऱ्यावर दोघांच्याहि वाट्याची नीति लादण्यानें खऱ्या नीतीची जोपासना होणें शक्य नाहीं असें ते प्रतिपादतात. नव्या स्त्रीच्या चारित्र्यावरील हल्ला कोणत्या मनोभूमिकेंतून उद्भवला आहे तें यावरून स्पष्ट व्हावें.

आधुनिक स्त्रीचा असभ्य पोषाख हा अलीकडे चर्चेचा मोठा लोकप्रिय विषय झाला आहे. त्या संबंधानेंहि थोडें लिहिणें अवश्य आहे. याबाबतींत लक्षांत ठेवण्यासारखी पहिली गोष्ट म्हणजे ही कीं पोषाखाच्या सभ्यासभ्यतेविषयींच्या आपल्या कल्पना सतत बदलत असतात. काल जो पोषाख भडक किंवा उत्तान वाटत होता तो आज सार्वत्रिक झाल्यानंतर सभ्य वाटूं लागतो. प्रत्येक पिढींतच वृद्ध मंडळी तरुणांच्या पोषाखास व वर्तनास थिल्लर म्हणून संबोधीत असतात. स्त्रियांचा आजचा पोषाख गेल्या पिढींतील स्त्रियांच्या पोषाखापेक्षां वेगळा आहे हें खरें आहे, पण तेवढ्यावरून तो असभ्य आहे अशी हाकाटी करणें ऐतिहासिक दृष्टीच्या अभावाचेंच द्योतक आहे. दुसरी गोष्ट अशी आहे कीं पोषाख स्त्रियांचेच तेवढे बदलले आणि पुरुषांचे जुनेच कायम राहिले असें थोडेंच आहे. पण म्हणून आजचे पुरुष असभ्य झाले आहेत असें आपण म्हणत नाहीं. आतां हें खरें आहे कीं जरी प्रत्येक पिढीच्या सभ्यासभ्यतेच्या कल्पना थोड्याफार वेगळ्या असल्या तरी कोणत्याहि एका पिढींत सभ्य आणि असभ्य यांचे कांही शिष्टसंमत संकेत असतात; आणि त्या दृष्टीनें आजच्या कांही स्त्रियांचा पोषाख वर्तमान निकषानेंहि उत्तान असेल, नाहीं असें नाहीं. परंतु ही गोष्ट प्रत्येक पिढीला लागू आहे. प्रत्येक पिढींत शौकी, भडक, आकर्षक पोषाख करणारे स्त्रीपुरुष आढळतात. चालू पिढीच तेवढी या बाबतींत दोषी आहे असें नाहीं. आजच्या स्त्रीच्या पोषाखापैकी पोटिमा नांवाच्या पोलक्याचा जो नवीन प्रकार रूढ होत आहे त्यावर नीतिमार्त-डांचा विशेष कटाक्ष आहे, ह्यांचें आम्हांस मोठें आश्चर्य वाटतें. कारण पूर्वीच्या ज्या काळांत सर्व स्त्रिया जणूं सीता-सावित्री होत्या असा आव ही



अनुक्रमणिका







मंडळी आणतात त्या काळीं त्या ज्या चोळ्या घालीत होत्या त्याहून हा प्रकार मुळींच भिन्न नाहीं. आजच्या स्त्रीच्या अपुऱ्या पोषाखामुळें संस्कृति-रक्षकांना भयंकर धक्का बसलेला दिसतो. पण धर्माच्या नांवाखालीं शेकडों वर्षें त्यांनी निरपराध व असहाय विधवांवर कोणता पोषाख लादला होता याचें त्यांना विस्मरण झालेलें दिसतें. म्हणून सुधारकाचार्यांच्याच शब्दांत आम्ही त्यांना त्याचें स्मरण देतों. "आमच्या गतभर्तृकांची स्थिति याहूनहि विशेष शोचनीय आहे. त्यांच्या पदराला चोळीचेंसुद्धां पाठबळ नाहीं ! त्यानें दगा दिला कीं, त्या उघड्या पडल्याच ! शिवाय, गतभर्तृकांच्या पदरास त्यांचें डोकें झाकून ठेवण्याचें आणखी एक फाजील काम असतें ! या संबंधानें या हतभाग्य स्त्रिया एकसारख्या काचणींत असतात, असें म्हटलें तरी चालेल. आपल्या अंगाचा पाहिजे तो भाग उघडा पडला तरी हरकत नाहीं, पण आपलें डोकें उघडें पडतां कामा नये; कारण तें उघडें पडलें असतां आपल्या छलकांचा निर्दयपणा व आपल्या धर्माचा अधर्मीपणा उघडा पडेल, अशी भीति त्यांच्या मनांत सर्वकाळ वागत असते. यामुळें अडचणीच्या वेळीं अशा स्त्रियांच्या पाठी दिसतात. पण डोकीं कधींहि दिसत नाहींत."[1] ज्यावेळीं आगरकर त्या बिचाऱ्या विधवांच्या सुटकेकरितां तळमळून लिहीत होते त्यावेळीं संस्कृतिरक्षक त्यांची जिवंतपणी प्रेतयात्रा काढण्यांत गुंतले होते. यावरून न्याय, करुणा, सहानुभूति इत्यादि गुणांचें संस्कृति-रक्षकांना किती प्रेम होतें तें दिसून येतें.

शेवटची व सर्वात महत्त्वाची गोष्ट ही कीं सद्यःकालीन स्त्रीचा पोषाख असभ्य आहे असें मानलें तरी त्याचा संबंध सुधारकांशीं जोडणें म्हणजे अप्रस्तुतपणाचा कळस आहे. उच्छृंखल पोषाख करावा असें कुणाहि सुधारकानें केव्हांहि सांगितलेलें नाहीं. उलट याबाबतींत त्यांचे विचार किती निर्दोष होते हें आगरकरांच्या पुढील वचनावरून स्पष्ट होईल. "पोषाख असा असावा कीं जो घातला असतां कोणतेंहि काम करतांना हस्तपादादि अवयवांचे चलनादि व्यापार सहज होऊन, शरीरास कोणत्याहि प्रकारचे कष्ट होऊं नयेत, किंवा त्यांत वैरूप्यता दिसूं नये. जो पोषाख क्षणोक्षणीं सावरला नाहीं तर ज्यापासून हातीं घेतलेल्या कामास वारंवार हरकत होणार किंवा शरीर उघडें पडणार, असा पोषाख काय कामाचा ? स्त्रीची मान आणि कंबर यामधील मागला पुढला भाग नीटपणें झांकला जाऊन, कोपरापासून त्यांचे दोन्ही हात पाहिजे तें काम करण्यास हवे तिकडे फिरवितां येण्यासारखे असावे, या गोष्टीस बहुधा कोणीहि 'ना' म्हणणार नाहीं, असें आम्हास वाटतें."[2] सभ्य आचार-विचाराची तळमळ कोणास अधिक होती याचा याहून अधिक निर्णायक पुरावा काय द्यावा ?

सुधारकांचीं मतें अनीतीस प्रोत्साहन देणारीं आहेत असें विरोधक भासवीत असले तरी त्याचा खरा अर्थ एवढाच कीं तीं रूढ आचार-विचारांहून भिन्न आहेत. वस्तुस्थिति अशी आहे कीं नीतीचे अचल व चंचल असे दोन अंश असतात, आणि त्यांपैकी पहिलाच नीतीचा खरा गाभा असतो. त्या शाश्वत नीतितत्त्वासंबंधीं सुधारकांची भूमिका इतकी विशुद्ध आहे कीं तिला नांवें ठेवण्यास जागा नाहीं. आगरकर म्हणतात " 'सुधारक' आणि 'सुधारणा' या शब्दांचा विपरीत अर्थ करून, त्याच्या भरांत तुम्ही त्याविरुद्ध हवें तसें बहकूं लागला आहांत; पण हें पक्कें ध्यानांत ठेवा कीं, मांसाहार, मदिरापान, व्यभिचार, अनृत भाषण, विश्वासघात, अप्रामाणिकपणा, क्रूरपणा वगैरे गोष्टी खऱ्या

१ 'संपूर्ण आगरकर' भाग २, पान १५१

२ 'संपूर्ण आगरकर', भाग २, पा. १५०.








सुधारकांस तुम्हांपेक्षा अधिक निंद्य वाटतात. पण हीं महापातकें कितीहि वाढलीं तरी त्याची तुम्हांस विशेष काळजी वाटत नाही. "[3]

याच्या उलट परंपराभिमान्यांची समग्र दृष्टि नीतीच्या चंचल, बदलणाऱ्या अंशावर– तिच्या केवळ टरफलावर–खिळलेली असल्यामुळें परंपरागत आचारांतील शाश्वत नीतितत्त्वास बाधक असे भाग त्यांना दिसूं शकत नाहीत. एरव्ही स्त्रीला थोडी मोकळीक मिळून तिच्या वागण्यांत किंचित् स्वतंत्र वृत्ति दिसूं लागल्याबरोबर अनीतीची हाकाटी करणाऱ्या संस्कृत्यभिमान्यांना शतकानुशतकें चालत आलेली चारित्र्यहीन पुरुषांची भयंकर अनीति चालली नसती. त्यांना जर खऱ्या नीतीचें प्रेम असतें, तर अनाथ, विधवा, परित्यक्ता यांच्यावर होणारे अत्याचार, त्यांतून उद्भवणारी बेकायदा संतति, बदफैली पुरुषांकरता मुद्दाम निर्माण केलेला वेश्या-वर्ग या पुरुषांच्या दुराचाराच्या प्रतीकांनी ते अधिक चिंतित झालें असते. ज्या दुराचारी पुरुषांकरतां या स्त्रियांवर पिढ्यानुपिढ्या पतितावस्था लादली जाते ते मात्र कुलीन, अभिजात आणि सभ्यच राहतात. या व्यवस्थेंतील भयंकर अन्याय आणि अनीति ज्यांच्या लक्षांत येत नाहीं त्यांच्या नीति-विषयक कल्पना किती कोत्या, उथळ व ढोंगी-पणाच्या आहेत आणि त्यांची स्त्रियांच्या चारित्र्या-विषयींची चिंता कोणत्या दुष्ट बुद्धींतून उद्भवली आहे याची पूर्ण कल्पना येते.

३ 'संपूर्ण आगरकर,' भाग ३, पान ५८.

## (४)

वर उल्लेखिलेल्या आक्षेपांपैकी शेवटचा आक्षेप म्हणजे स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्यामुळें कुटुंबसंस्थे-वर ओढवलेला विनाश हा होय. कुटुंबसंस्थेचा विषय फार मोठा असल्यामुळें वरील आक्षेपास विस्तारानें उत्तर द्यावें लागेल. परंतु तेवढा अव-काश या लेखांत नसल्यामुळें तें कार्य स्वतंत्र लेखां-तंच करणें योग्य होईल.

---










श्री. जिनेंद्र नाईक

# जातिव्यवस्था - कांहीं विचार

आजकाल कांहीं वयस्क लोकांच्याकडून असें बोलण्यांत येतें कीं सध्याच्या तरुण पिढीला कांहीं दृष्टि नाहीं, ध्येय नाहीं. भारत स्वतंत्र झाला, नव्हे, त्याचें स्वातंत्र्य जात असलेल्या पिढीनें मिळवून दिलें. नव्या पिढीला त्यांच्या घरचा धनी केल्यानंतर, फक्त घरचा कारभारच त्यांनीं सुव्यवस्थित चालवायला पाहिजे असें नव्हे, तर सामाजिक प्रगतीबद्दलच्या ज्या सर्वमान्य कल्पना आहेत त्यानुसार आपली आणि इतरांची हळुहळू वाटचाल करवून आणायला हवी. अशा वाटचालीला हवी असणारी दृष्टि आणि शक्ति आजकालच्या समाजामध्यें आहे काय ?

## सामाजिक प्रश्नांचें स्वरूप

प्रत्येक समाजामध्यें कांहीं वेळेला कांही प्रश्न असतात. टिळक-आगरकरांच्या समाजापुढें विधवाविवाहाचा, बालविवाहाचा प्रश्न होता. विधवांना पुनर्विवाह करण्याची समाजानें बंदी घातली होती. बहुतेकांचे विवाह त्यांच्या संमतिविना वा संमतिपूर्वीच होत होते. पुनर्विवाहाचे आणि बालविवाहाचे प्रश्न त्यावेळच्या समाजांत निर्माण झाले याचें कारण तो समाज त्या प्रकारनें वर्तन करीत होता यामध्यें तर आहेच; पण यावर तो समाज विचार करीत होता, त्या विरुद्ध कांहीं समाजसुधारक सतत प्रचार करून एक वैचारिक बैठक निर्माण करीत होते, यामध्येंहि आहे. या वरील विवेचनावरून इतकेंच सिद्ध होईल कीं सामाजिक समस्या आणि इतर कोणत्याहि समस्या ( उदा-पदार्थविज्ञान, गणित इ. शास्त्रांतल्या समस्या ) यामधला मुख्य फरक हा कीं सामाजिक समस्यांचें अस्तित्व, हें तशा प्रकारचें सामाजिक वर्तन तो समाज करतो आणि त्या वर्तनाविरुद्ध त्या समाजामध्यें कांहीं वैचारिक जागृति होते, या दोन्ही गोष्टींमध्यें आहे.

अशा कांहीं सामाजिक समस्या आजकालच्या समाजापुढें आहेत काय ? आजचा समाज अशा कोणत्या सामाजिक प्रश्नांवर सतत विचार करतो आहे ? फुल्यांनीं जातिव्यवस्थेविरुद्ध बंड पुकारलें; आगरकरांनीं स्त्रियांवर होत असलेल्या अन्यायाविरुद्ध तुतारी फुंकली. पण असें बंड, अशी तुतारी आजचा समाज, किंवा समाजातली एखादी तरी प्रखर व्यक्ति कशाविरुद्ध पुकारते आहे ?

## जातिव्यवस्थेविरुद्ध विचार कां प्रकट होत नाहींत

या प्रश्नांचीं उत्तरें देणें वाटतें तितकें सोपें नाहीं. कांहीं लोक म्हणतील, जातिव्यवस्थेविरुद्ध, हुंड्याच्या चालीविरुद्ध, आजकाल काय कमी लोक बोलतात ? गांवच्या सरपंचापासून ते प्रांताच्या पुढाऱ्यापर्यंत प्रत्येकजण या प्रश्नावर बऱ्याच वेळेला वक्तव्य करतो. तेव्हां, या समस्यांची जाणीव आजच्या महाराष्ट्रीय समाजाला नाहीं किंवा त्याविरुद्ध इथें मत निर्माण होत नाहीं, या म्हणण्यामध्यें काय तथ्यांश आहे ?

वर सांगितल्याप्रमाणें सामाजिक समस्यांचें अस्तित्व हें त्या प्रकारचें होत असलेलें सामाजिक वर्तन आणि त्या विरुद्ध होत असलेलें मतपरिवर्तन या दोन्ही गोष्टींवर सारख्याच प्रमाणांत आहे. जातिव्यवस्था किंवा हुंड्याची चाल यांपैकीं कोणताहि प्रश्न घेतला, तर या प्रकारचें सामाजिक वर्तन आपल्या समाजामध्यें होत आहे, हें आजकालच्या महाराष्ट्रीय समाजाची माहिती असलेल्या कोणालाहि सहज मान्य होईल. प्रश्न हा आहे कीं त्या विरुद्ध विचारप्रवाह वहातो आहे काय ? आचार होत आहेत काय ?

आजकाल जातिसंस्थेविरुद्ध सतत प्रचार केला जातो काय याचें उत्तर आजकाल होत असलेल्या लिखाणाच्या अभ्यासावरून सहज लक्षांत येईल. या बाबत 'नवभारत' सारख्या विचारप्रवर्तक मासिकाचें जरी उदाहरण घेतलें तरी आपणाला असें दिसेल कीं जातिव्यवस्था ही सामाजिक समस्येच्या स्वरूपांत आजच्या विचारवंतांच्यापुढें नाहींच. हा लेख लिहितेवेळीं प्रस्तुत लेखकाच्या संग्रही असणाऱ्या मार्च १९५९ ते नोव्हें-












बर १९५९ या ९ अंकामध्यें प्रसिद्ध झालेल्या लेखांचें या बाबतचें वर्गीकरण खालील प्रकारें आहे.

एकूण लेख ७६ जातिव्यवस्थेवर लिहिलेले लेख शून्य.

जी स्थिति नवभारतामधल्या लिखाणाबाबतची, जवळजवळ तशींच इतर साप्ताहिकें वा मासिकांतल्या लिखाणाबाबतची. आजकालचें बहुतेक लिखाण दैनिक वर्तमानपत्रें वा साप्ताहिकें यामधून होतें. पण या लिखाणांच्या अभ्यासावरून सुद्धां, प्रस्तुत लेखकाच्या अवलोकनाप्रमाणें याशिवाय दुसरा कोणता निष्कर्ष निघेल असें वाटत नाहीं.

यावर कांहीं लोक असा आक्षेप घेतील कीं जातिव्यवस्थेवर आज बरेचसें लिखाण होत नाहीं, याचें कारण तिच्यामुळें होत असलेल्या अन्यायाची तीव्रता बरीच कमी झालेली आहे. तिचें पूर्वीचे स्वरूप पार पालटल्यामुळें तिचें अस्तित्व हें फक्त नांवापुरतेंच आहे.

कांहीं मर्यादेपर्यंत वरील विचार खरे असले तरी जाति-व्यवस्था - आज अन्यायकारक नाहीं, तिचें अस्तित्व हें बुद्धिमान्य आहे, हें जोपर्यंत सिद्ध होत नाहीं तोपर्यंत तिच्या विरुद्ध वादळ कां उठूं नये हें कळत नाहीं. अन्यायांतला उघडपणा कदाचित् कमी झालेला असेल; तीव्रताहि कमी झालेली असेल; पण जातिसंस्था हीच जर मुळी न्यायतत्त्वांच्या उघड विरोधी आहे तर या ना त्या स्वरूपांत ती नेहमीच सामाजिक विकृति म्हणूनच रहाणार. तिच्यामुळें होत असलेल्या पूर्वींच्या अन्यायाचें स्वरूप कदाचित् बदललेलें असेल; पण म्हणून नव्या स्वरूपांत ती बुद्धिमान्य होऊं शकत नाहीं वा न्याय देऊं शकत नाहीं. अन् जोपर्यंत ती अशा सामाजिक विकृतीच्या स्वरूपांत अस्तित्वांत आहे तोपर्यंत तिच्या उच्चाटणासाठी प्रयत्न झाले नाहीं तर त्या समाजाची त्याबाबतची उदासीनता, असमर्थता, बुद्धिहीनता हेच सिद्ध होत नाहीं काय ?

## उच्चाटणप्रयत्नांचाहि अभाव

आतांपर्यंत आपण जातिसंस्थेविरुद्ध आजकाल विशेष प्रचार होत नाहीं हें पाहिलें. आतां तिच्या उच्चाटणासाठी होत असलेल्या प्रयत्नाकडे पाहिलें तरी तिच्या विरुद्धच्या प्रचारासारखीच स्थिति इथेहि दिसेल. जातिसंस्थेचें उच्चाटण करण्यासाठी धडपडणारी अख्या महाराष्ट्रांत एकतरी संघटना आज अस्तित्वांत आहे काय ? आंतर-जातीय विवाह घडवून आणण्यासाठी पद्धतशीर आणि सतत प्रयत्न करणारी, अशा होत असलेल्या विवाहितांना सामाजिक आधार देणारी आज नांवापुरती तरी एखादी संस्था अस्तित्वांत आहे ? किंबहुना एखाद्या विशिष्ट ध्येयासाठी संघटणा करायच्या, संस्था काढायच्या, या पाश्चात्य लोकांच्या सामाजिक संवयी आपल्या संस्कृतींतच नाहींत. या उलट, सामाजिक संघटणाच मुळीं कार्याला अडथळाकारक आहेत. आणि म्हणून असणाऱ्या संघटणासुद्धां बरखास्त कराव्यात ( उदा० विनोबांची सर्वोदय संघटणेबाबतची विचारसरणी ) यासारखी सैल विचारसरणी, तास अर्धा-तासाच्या सभेंतून जन्मापासून लागलेल्या सवयींचें उच्चाटण होईल या सारख्या खुळचट कल्पना, आणि अशा व्यक्तींची वा कृतीची आपल्या समाजाकडून केली जाणारी वाहवा, हीच आपली खरी संस्कृति; हाच आपला खरा वारसा.

जातिव्यवस्थेच्या उच्चाटणाचे आजकाल विशेष बुद्धया प्रयत्न होत नाहींत हें पाहिलेंच. अशा परिस्थितींत जातिसंस्था ही हळुहळू मोडकळीला येईल काय ? कांहीं लोकांचें म्हणणें असें कीं पूर्वी इतका जातिव्यवस्थेचा पगडा आजकाल आपल्या जीवनावर नाहीं. तिच्यामुळें होत असलेल्या अन्यायाची तीव्रताच कमी झालेली आहे असें नव्हे तर, पूर्वी कधींहि होत नसलेल्या आणि आजकाल दिवसानुदिवस अधिक प्रमाणांत होत असलेल्या आंतर-जातीय विवाहावरून, हळुहळू पण निश्चितपणें जातिसंस्था मोडकळीस आलेली आहे हें सिद्ध होत नाहीं काय ?

## जातिव्यवस्थेचें वाढतें प्राबल्य

कांहीं अंशीं वरील विचारसरणीत तथ्य आहे. जातिव्यवस्था पूर्वी इतकी अन्यायकारक राहिलेली नाहीं हें निश्चितच खरें. पण आज आंतरजातीय विवाहाचीं कांहीं उदाहरणें आपणाला दिसतात म्हणून ती आपोआपच 'मार्गाला लागलेली आहे' या विचारसरणीमध्यें आजच्या आपल्या समाजाच्या अभ्यासकाला, विशेष तथ्य दिसत नाहीं. या उलट कांहीं समाजशास्त्रज्ञांचा अभ्यास हेंच दाखवितो कीं नव्या परिस्थितीत जातिव्यवस्था ही तिच्या समाजघटकाला दिवसानुदिवस










जादा मदतकारक होत असल्यामुळें ती सुशिक्षितांनाहि आजकाल फायद्याची वाटते. मुंबई विद्यापीठाच्या समाजशास्त्र विभागाचे प्रमुख डॉ. कपाडिया यांनीं कांहीं दिवसांपूर्वी Sociological Bulletin मध्यें "Changing patterns of Hindu Marriage and family" या शीर्षकाखालीं कांहीं लेख लिहिले होते. ५१३ गुजराथी पदवीधरांच्या मुलाखती घेऊन त्यांनीं विवाहसंस्था, कुटुंबसंस्था आणि जातिसंस्था यांकडे आजकालच्या सुशिक्षितांची पहाण्याची दृष्टि कोणती याचा अभ्यास केलेला आहे. जातिव्यवस्थेच्या आजच्या स्वरूपाची छाननी करण्याच्या दृष्टीनें त्यांचा हा अभ्यास उद्‌बोधक होईल. या ५१३ पदवीधरांपैकीं ५३% लोकांनीं असें सांगितलें कीं त्यांना मदत करण्यासाठीं त्यांच्या जातींचे या ना त्या प्रकारचे निधि आहेत. ६३·२ टक्के लोकांना अशी आर्थिक मदत जाति-संस्थांकडून मिळते ती हवीशी वा बरी वाटते. साधारणतः ५०% लोकांना त्यांच्या जातींनीं चालविलेल्या साप्ताहिकें वा मासिकांची जाणीव आहे; यांपैकीं ३३·४ टक्के लोक अशा पत्रकांचे वर्गणीदार आहेत, तर १३·१ टक्के पदवीधर अशा पत्रकांतून लिखाण करतात. ४४·१ टक्के लोकांच्या जातींचीं सम्मेलनें होतात तर ३३ टक्के लोकांना अशा सम्मेलनांतून भाग घ्यावेसें वाटतें.

वरील अभ्यासावरून एकच सिद्ध होतें कीं, जातिव्यवस्था ही आजकालच्या धकाधकीच्या जीवनांत एक आधारभूत संस्था म्हणून सुशिक्षितांना भासते. आजकाल जवळजवळ प्रत्येक जातींचीं मोठ्या शहरांतून स्वजातीय विद्यार्थ्यांसाठीं चालविलेलीं वसतिगृहें आहेत. निरनिराळ्या स्कॉलरशिप्स आहेत. सहकारी संस्था आहेत. बँका आहेत. हाऊसिंग बोर्डाच्या मदतीनें बांधलेल्या इमारती आहेत. आणि ह्या सर्व गोष्टी लोकांना अनोळखया दुनियेंत मदतकारक ठरताहेत. आणि म्हणून जातिसंस्था ही पूर्वीसारखी आपल्या मार्गांत अडथळा करणारी व्यवस्था न रहातां एक सामाजिक आधार म्हणून ती नव्या स्वरूपांत भासते आहे.

या वरील कारणाशिवाय आणखी एक कारण जातिसंस्थेचीं पाळेंमुळें दृढमूल करण्यासाठीं बहुतांशीं कारणीभूत होत आहे. जातिसंस्थेच्या पूर्वीच्या स्वरूपांत मूठभर ब्राह्मणांच्या हातांत जवळजवळ सारी सत्ता होती. पण हल्ली ती अशा अल्पसंख्य वर्गाच्या हातांतून गेलेली आहे वा बहुसंख्य लोकांच्या हातांत आलेली आहे; इतकेंच नव्हे तर एका जातीच्या हातांतून दुसऱ्या जातीच्या वा जातींच्या हातांत ती जाते कीं काय अशी परिस्थिति निर्माण झालेली आहे. जातीय दृष्टिकोन राजकीय क्षेत्रांत शिरलेला आहे हें नाकारण्यांत विशेष अर्थ आहे असें वाटत नाहीं. तो फक्त राजकीय क्षेत्रांतच शिरलेला आहे असें नव्हे तर जीवनाच्या इतर सर्वहि क्षेत्रांत त्याचा व्याप वाढतो आहे. अशा परिस्थितींत जातिसंस्थेचें फक्त स्वरूपच बदलेलें आहे असें नव्हे तर तिच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोनसुद्धा हळुं हळुं बदलत आहे. पूर्वी जातिसंस्थेविरुद्ध बंड होत होतें याचें कारण ती बहुसंख्य लोकांना अन्यायकारक वाटत होती. पण नव्या परिस्थितींत ती बहुसंख्य लोकांना फायद्याची ठरण्याची शक्यता निर्माण झालेली आहे. अशावेळीं जातिव्यवस्था आपोआप मोडेल हें म्हणणें थोडेसें वरवरचें वा घाईचें वाटतें. कोणतीहि सामाजिक संस्था वा व्यवस्था आपोआप मोडत नाहीं; मोडलेली नाहीं. जशी नवी व्यवस्था ही प्रयत्नाअंतीं येते तशी जुनी घालविण्यासाठींसुद्धां प्रयत्न हवे असतात. महाराष्ट्राच्या वा भारताच्या सामाजिक जीवनांतून जातीयवादाची कीड कायमची मारून टाकायची असेल तर तशी एक बुद्धिवादी बैठक निर्माण करायला हवी. मानवतावादी दृष्टिकोन स्वीकारायला हवा. आंतरजातीय विवाह घडवून आणणाऱ्या संस्था उभारायला हव्यात. बहुजातीय तरुण तरुणींना एकत्रित आणणारे क्लब्स काढायला हवेत. अशा प्रयत्नांतूनच जातीयवादाचें हें भूत गाडलें जाईल; निव्वळ सदिच्छेनें नव्हे. अन् जर असा प्रयत्न या क्षणीं झाला नाहीं तर कुणी सांगावें उद्याचा प्रयत्न केवळ उशीराचा वा निष्फळच नव्हे तर उद्याच्या वातावरणांत नकोसा सुद्धां ठरेल. आज राजकीय सत्तेची वा सामाजिक फायद्याची विभागणी निव्वळ जाति बरहुकूम होत नाहीं. पण नव्या परिस्थितींत जातीमुळें सहज मिळणाऱ्या फायद्याची बहुसंख्यांना चटक लागली तर मग सारी व्यवस्था बदलण्याचें काम निश्चितपणानें बरेंच कठीण जाईल.








प्रा. सुमंत मुरंजन

# मानवाचें भवितव्य*

लोकसंख्याशास्त्र व इतर मानवजीवनशास्त्रें यांची गेल्या पांचपन्नास वर्षांत आश्चर्यकारक प्रगति झालेली आहे. तथापि एखाद्या मानवसमाजाचें भविष्यकथन करणें हें एखाद्या माणसाचें भविष्य वर्तविण्याइतकेंच दुष्कर आहे. असल्या विषयावर चांगले चांगले लेखक पुष्कळ वेळां अधिकारवाणीनें निरनिराळीं विधानें करतांना आढळतात. परंतु जरा खोलवर विचार केल्यास असल्या विधानांत शास्त्रीयतेपेक्षां व्यक्तिगत आशावाद अथवा निराशावाद यांचेंच प्रतिबिंब दिसण्याचा संभव अधिक असतो. शास्त्रज्ञांची देखील अशी फसगत कां होते हा मोठा मननीय प्रश्न आहे. या क्षेत्रांतील थोडीशीं कोडीं उदाहरणार्थ घेऊन असल्या फसगतींची मीमांसा करण्याचें या लेखांत योजिलें आहे.

## (१) पुरुषस्त्रीप्रमाण

प्रत्येक युद्धाच्या शेवटीं व नंतर कांहीं कालपर्यंत मुलींपेक्षां जास्त मुलगे जन्मास येतात असा अनुभव आहे. पहिल्या व दुसऱ्या महायुद्धकालांत असाच अनुभव आला आहे. यावरून पुष्कळांचें असें अनुमान आहे कीं निसर्गांतच विसकटलेली घडी नीट ताळयावर आणण्याची सुप्त शक्ति आहे. अर्थात् असल्या अनुमानांची कार्यकारणपूर्वक छाननी केल्याशिवाय त्यांस शास्त्रीय नियमांचा दर्जा देणें योग्य नाहीं. या विशिष्ट अनुमानासंबंधीं पहिलीच अडचण भासते ती अशी : उपरिनिर्दिष्ट अनुभव युद्धमान राष्ट्रांसच आला असें नाहीं. युद्धापासून अलिप्त असलेल्या राष्ट्रांतहि तशीच घटना आढळली. मग तटस्थ राष्ट्रांत युद्धामुळें रोजगारी वाढली, वाढत्या रोजगारीमुळें पुरुषश्रमिकांची अधिक चणचण भासूं लागली व त्याचा परिणाम म्हणून मुलगे अधिक निपजण्याचें वातावरण अस्तित्वांत आलें असा बादरायण संबंध लावावयाचा कीं काय न कळे. तथापि मुलींपेक्षां अधिक मुलगे जन्मास येण्याचीं मूळ कारणें काय असावींत हा विचारणीय प्रश्न आहे खास.

सर्वसाधारणतः कांहीं वयोमर्यादेपर्यंत नव्या जन्मलेल्या बालकांत मुलींच्या मानानें मुलगे जास्त नाजूक असतात असा लोकसंख्याशास्त्राचा अनुभव व वैद्यकशास्त्राचा सिद्धान्त आहे. प्रथमवयांत मुलांची मृत्युसंख्या मुलींच्या मानानें जास्त भरते हें सुप्रसिद्धच आहे. जन्मानंतर जी गोष्ट अनुभवसिद्ध आहे ती गोष्ट जन्मापूर्वी म्हणजे गर्भवासांत देखील खरी असण्याचा संभव बराच आहे असा तर्क केला तर तो वावगा दिसत नाहीं. गर्भवासाची परिस्थिति जर अधिक अनुकूल झाली तर गर्भास पुल्लिंगी कलाटणी, नाहींतर स्त्रीलिंगी कलाटणी मिळणें शक्य दिसतें. गर्भवासाची अनुकुल परिस्थिति म्हणजे कोणती असावी? सर्वसाधारणतः गर्भवासाची अनुकूल परिस्थिति म्हणजे आईचें वय होय. अगदी तरूणपणचीं गर्भारपणें व बाळंतपणें सुलभ जातात हा सर्वमान्य अनुभव आहे. तेव्हां युद्धासारख्या कारणानें मुलींचीं लग्नें लांबणीवर टाकण्याच्या प्रवृत्तीनें उलट खाली व स्त्रियांचीं पहिलीं, पहिलीं बाळंतपणें पडत्यावयांत घडूं लागलीं तर मुलांची संख्या अधिक निपजावी असा तर्क त्यावरून निघतो.

दुर्दैवानें या समजुतीस व तर्कास युद्धकालची परिस्थिति सकृद्दर्शनी तरी पुष्टी देते असें वाटत नाहीं. १९४३–४७ कालांत युद्धमान राष्ट्रांत आयांचें प्रथम प्रसुतीचें वय तितकेंसें खालीं पडलेलें आढळत नाहीं. अधिक छाननी केल्यावर शास्त्रज्ञांचें असें मत पडतें कीं आईच्या प्रसुतिवयाचा व मुलगें होण्याचा विशेष संबंध नाहीं. संबंध आहे तो इतर दोन गोष्टींचा. पहिली गोष्ट आईच्या वयापेक्षां बापाच्या वयाचा पुत्रजन्माशीं

* B. B. C. ची वार्षिक व्याख्यानमाला १९५९ साली प्रा. पी. बी. मेडावर F. R. C. S. यांनीं गुंफिली. त्या व्याख्यानांच्या अनुरोधानें प्रस्तुत लेख लिहिलेला आहे.



अनुक्रमणिका








अधिक संबंध असावा. दुसरें, एखाद्या महिन्यांत वा वर्षांत जन्मलेल्या १०० बालकांत प्रथमप्रथमचीं बाळंतपणें किती व नंतरनंतरचीं बाळंतपणें किती यावर लिंगभेद अवलंबित दिसतो. बाप जितके तरूण व आयांचे पाळणे जितके प्रारंभीचे तितके पुत्ररत्नांचा संभव अधिक असतो. युद्धाचें संकट उत्पन्न झाल्यावर ठरलेलीं लग्नें ताबडतोब उरकण्याच्या घाईमुळें गृहस्थ झालेल्या तरुणांची संख्या फुगली, बाळंतिणींत प्रारंभीच्या मातृत्वाचें प्रमाण वाढलें व या दोन कारणांनीं मुलगे अधिक निपजले असें अनुमान आहे. तथापि नव्या गृहस्थांचें तारुण्य व आयांचीं प्रथम बाळंतपणें यांची संख्याशास्त्राप्रमाणें छाननी केली तर या प्रमाणांत फेरबदल तितकासा उठावदार दिसत नाहीं व म्हणून वरील तर्क शास्त्रीयपदास पात्र नाहीं. तथापि भारतांत लहानपणीं लग्नें करण्याची प्रथा शतकानुशतकें होती व भारतांत इतर कोणत्याहि युरोपीय देशांत न आढळणारें पुरुषांचें संख्याधिक्य होतें व आहे हीं सत्यें वरील तर्कास पुष्टीदायकच दिसतात.

## (२) जगण्याची पात्रता

वैद्यकशास्त्र व आरोग्यसंरक्षण यामुळें भारतांत मृत्युप्रमाण खालीं पडत आहे व माणसांची आयुर्मर्यादा वाढत आहे. या शास्त्रांची प्रगति झाली नसती तर आज जिवंत असलेल्या इसमांपैकीं बरेच इसम यापूर्वीच नष्ट झाले असते. यावर असें अनुमान आहे कीं या शास्त्रांच्या प्रगतिमुळें जगण्यास अपात्र असणारीं बरींच माणसें जगतात, अपत्योत्पादन करतात व एकंदर सामाजिक जीवनाची पातळी खालीं नेतात. या अनुमानांत जगण्याची पात्रता म्हणजे अपत्योत्पादन करण्याची योग्यता एवढाच अर्थ अभिप्रेत आहे. जन्माला आलेलीं माणसें औषधोपचारांनीं कांहीं वर्षें अधिक जगलीं तर तीं मेलीं असतीं तर बरीं असें म्हणण्यास कोणीहि सहसा धजावणार नाहीं.

वरील समजुतीचा मुख्य आधार म्हणजे कांहीं शारीरिक व मानसिक उणीवा व व्याधी अनुवंशिक असतात हा विश्वास होय. गेल्या शंभर दीडशें वर्षांत वंशपरंपरागत उणीवांच्या व व्याधींच्या वेळोवेळीं शास्त्रमान्य झालेल्या याद्या तपासल्या तर त्यांत घडलेले फेरबदल आश्चर्यजनकच आढळतात. क्षणभर अनुवंशिक व्याधींचें अस्तित्व मान्य केलें तरी त्या व्याधींचा व लवकर मरण्याचा संबंध काय हा प्रश्न उरतोच. वैद्यकशास्त्रावर व आरोग्यशास्त्रावर आक्षेप घेणाऱ्या माणसांचें म्हणणें असें दिसतें कीं रोगराईंना तोंड देऊन जो बचावतो तो जगण्यास पात्र व जो मृत्युमुखीं पडतो तो अपात्र होय. आतांपर्यंत माणूस प्लेग, कॉलरा, देवी वगैरे भयंकर साथींतून गेलेला आहे. ज्याप्रमाणें ॲन्टीबायोटिक्स अथवा पेनिसिलीनला दाद न देणारे रोगजन्तूंची विलक्षण वाढ झाली आहे त्याप्रमाणें हल्लीचा माणूस वरील साथीस टक्कर देण्यास समर्थ म्हणूनच बचावला आहे. रोगराईचा प्रतिकार करण्याची नैसर्गिक शक्ति म्हणजेच जगण्याची पात्रता अशी ही एकंदर व्याख्या दिसते. ही नैसर्गिक शक्ती बाप तसा मुलगा या न्यायानें पुढील पिढींत उतरते व समाजाची जीवनपात्रता उन्नत होते असें त्यांचें पुढील अनुमान आहे.

Subtertian Malaria या रोगाचें आजपर्यंत झालेलें संशोधन या संबंधांत फार सूचक आहे. ज्या प्रदेशांत हा मलेरिया दृढमूल झाला आहे तिकडील माणसांत दोन प्रकारच्या रक्तांचें संमिश्रण आढळतें—एक हेमोग्लोबिन S व दुसरें हेमोग्लोबिन A. ज्या माणसांच्या रक्तांत हेमोग्लोबिन S ३० ते ४० टक्के प्रमाणांत असतें ते मलेरियास चांगली टक्कर देतात. हे हेमोग्लोबिन S मलेरियाचे जन्तु वाढूं देत नाहींत. या प्रतिकाराच्या क्रियेंत माणसाच्या रक्तांतील तांबडे बिंदु आपला मूळचा गोल आकार सोडून कोयत्याचा आकार घेतात. ज्यांचे तांबडे रक्तबिंदु कोयत्याच्या आकाराचे बनतात त्यावर मलेरियाच्या जंतूंचा प्रभाव चालत नाहीं.

यावरून उपरिनिर्दिष्ट प्रदेशांत कोयत्याच्या आकाराचे तांबडे रक्तबिंदु असणें म्हणजेच जगण्याची पात्रता होय. परंतु या पात्रतेचें पर्यवसान पुढें अपत्यनाशांत होतें! हेमोग्लोबिन A चें हेमोग्लोबिन S मध्यें रूपांतर करणारी बीजपेशी माणसास आपल्या आईबापांपैकीं एकापासूनच प्राप्त होते. या बीजपेशीमुळेंच A चें S असें रुपांतर घडतें व S पासून कोयत्याच्या आकाराचे रक्तबिंदु तयार होतात. परंतु जीवनास पात्र म्हणून सर्व पुरुषांचे व सर्व स्त्रियांचे रक्तबिंदु कोयत्याच्या आका-

राचे झाले तर समाजावर भलतीच आपत्ति कोसळेल. कारण नवरा व बायको या दोघांचेहि रक्तबिंदु कोयत्याच्या आकाराचे असले तर त्यांची संतति जगत नाहीं ! जगण्याची पात्रता प्राप्त करावी म्हटलें तर सर्व समाजाचा नाश ओढवण्याची किंमत द्यावी लागेल !

मनुष्य काय किंवा पशु काय त्यांचे अनुवांशिक गुण मेंडेलच्या नियमाप्रमाणेंच एका पिढीपासून दुसऱ्या पिढींत उतरतात. मेंडेलच्या नियमाचा आश्रय करून आपणास भविष्यकालचा मानव आपल्या इच्छेप्रमाणें निर्माण करतां येईल किंवा नाहीं हा मोठा चिंतनीय विषय आहे.

नवीन मनुष्यसमाज निर्माण करावयाचा म्हटला तर दोन तऱ्हेची उपाययोजना शक्य दिसते. एक, आपणाला हवे असतील त्या गुणांचीं माणसें बाजूला करून त्यांचा निराळा समाज स्थापणें. अर्थात् आपणाला हवे असणाऱ्या गुणांचा आराखडा तयार करणें हें कांहीं सोपें काम नाहीं. दुसरा उपाय असा कीं व्यक्तीकडे लक्ष न देतां समाजांत गुणांचें जितकें विविधत्व साधेल तशी व्यवस्था करावयाची. समाजांत गुणविविधत्व असलें म्हणजे कोणतेंहि नवेंजुनें संकट आलें तरी त्यास तोंड देऊन बचावणारीं कांहीं तरी माणसें समाजांत निघतीलच. याप्रमाणें कांहीं व्यक्ती नष्ट झाल्या तरी समाजाचें व मनुष्यजातीचें चक्र अविरत चालु राहील. पहिल्या उपाययोजनेनुसार बचावण्याची पात्रता व्यक्तीगत राखण्याचा प्रयत्न आहे तर दुसऱ्या उपाययोजनेनें ती पात्रता जमातीस प्राप्त होईल. पहिला उपाय बरा कीं दुसरा बरा हें ठरवायचें म्हटलें तर माणसामाणसांत विविधत्व किती असतें त्याचा अभ्यास करणें इष्ट आहे. हें विविधत्व तीन प्रकारचें असतें.

माणसामाणसांतील कांहीं गुणभेद असे असतात कीं, विशिष्ट गुण बहुसंख्यांक लोकांत आढळत नसून फक्त अल्पसंख्यांक लोकांतच ते सांपडतात. हेमोफिलिया किंवा हटिंगटन या व्याधी बहुसंख्यांक लोकांत दिसत नाहींत. अशीच जर इतर गुणांविषयीं स्थिति असती तर आपणास पहिला उपाय सहज योजितां आला असता. परंतु हा उपाय अमलांत आणतां आला असता तरी त्यांत एक मोठी अडचण उपस्थित होणें शक्य होतें. ठराविक गुणांचेंच जर सातत्य राखावयाचें म्हटलें तर उत्क्रांति कशी होणार ? याला उत्तर असें दिलें जात असे कीं नवे गुण मंडुकप्लुतिन्यायानें उत्पन्न होतील व ते गुण जर जीवनास अनुकूल असतील तर तीं माणसें बचावतील. व उत्क्रांति चालू राहील. ही समजूत २० वर्षांपूर्वी प्रचलित होती. परंतु आतां असें सिद्ध झालें आहे कीं त्याच त्याच गुणांच्या माणसांत पिढ्यान्‌पिढ्या विवाह चालू राहिले तर प्रजा निःसत्व होत जाऊन शेवटीं वंश नष्ट होतो !

सर्वसाधारण अनुभव असा आहे कीं माणसांत आढळणाऱ्या अनेक गुणांपैकीं एखादा गुण घेतला तर अस्ति व नास्ति अशा माणसांची संख्या जवळ जवळ तेवढीच भरते. याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे स्त्री व पुरुष असा लिंगभेद जवळ जवळ तुल्यबल असतो हें होय. हें तुल्यबळ मनुष्यसमाजास फार हितावह असतें. कारण दोन निराळ्या गुणांचे आईबाप एकत्र येणें हे संततीस फार हितावह आहे असा प्राणिशास्त्रज्ञांचा निर्वाळा आहे.

माणसांत तिसऱ्या वर्गाचें विविधत्व असें आहे कीं त्या बाबतींतच अस्ति व नास्ति असें वर्गीकरण करणेंच शक्य नाहीं. माणसांची उंची, रंग, केस वगैरे वैशिष्ट्यें इतक्या अल्प प्रमाणांत बदलतात कीं भेदरेषा अशी कल्पितांच येत नाहीं. निपुत्रिकत्व व बहुपुत्रिकत्व हे गुण देखील या तऱ्हेचेच आहेत. या गुणांच्या विषयीं अनुभव असा आहे कीं, समान गुणांचे आईबाप एकत्र आणले तर कांहीं पिढ्या हे गुण अपत्यांत उतरतात. परंतु नंतर त्यांत अवनतीची कळा उद्भवते. पुष्कळदा वंशच संपुष्टात येतो ! हे प्रयोग जरी पशूवर केले असले तरी माणसांच्या बाबतीत निराळा अनुभव येईल असें मानणें अशास्त्रीयच होईल.

या विवेचनावरून असें दिसतें कीं विशिष्ट गुणांचा समाज निर्माण करणें शक्य नाहीं व इष्ट नाहीं. गुणांचें विविधत्व असण्यानें व असल्या विविधत्वास उत्तेजन देण्यानेंच मानवजातीचें कल्याण शक्य आहे. अनुवांशिक गुणांच्या पाठीमागें लागणें शहाणपणाचें नाहीं. मनुष्यसमाजास सुधारण्याचा उत्कृष्ट व खात्रीचा उपाय म्हणजे तो ज्या वातावरणांत वाढतो तें वातावरण सुधारणें हा होय.

### ( ३ ) लोकसंख्येचा वृद्धिक्षय

लोकसंख्येचें भवितव्य व नियमन हे हल्लीं फार ज्वलंत विषय आहेत. तसें पाहिलें तर लोकसंख्याशास्त्र हें अत्यंत प्रगत शास्त्रांपैकीं एक शास्त्र आहे. संततिनियमनाचा वाढता जोर पाहून मनुष्यसमाजाविषयीं निरनिराळीं भविष्यें आज कितीतरी प्रचलित असलेलीं आढळतात. युद्धापूर्वी इंग्लंड वगैरे देशांत पांच-पन्नास वर्षांनीं लोकसंख्या घटत जाणार अशा तऱ्हेचा प्रवाद मोठमोठ्या संख्याशास्त्रज्ञांकडून ऐकूं येत असे. भारताची संख्या चालु शतकांत अनपेक्षित रीत्या वाढली आहे, लवकरच ती ४० कोटीवरून ५० कोटीवर जाईल व इ. स. २००० वर्षापर्यंत ती ७०० कोटीवर भरेल अशी साधार भीति सर्वत्र पसरलेली आहे. याविषयीं पाश्चात्य राष्ट्राविषयीं भविष्यें तरी सपशेल खोटीं ठरलीं आहेत. लोकसंख्येबाबत अचूक भविष्य करणें किती गुंतागुंतीचें असतें याची कल्पना फारच थोड्या लोकांस असते. आंकडेशास्त्रज्ञांची एवढी फसगत कां झाली हा मननीय विषय आहे.

लोससंख्याशास्त्राची एक मोठी अडचण अशी आहे कीं कित्येक पुढारलेल्या देशांतहि जरूर तेवढी समग्र माहिती आजदेखील संग्रहीं नाहीं. आयांचीं प्रत्येक बाळंतपणाच्या समयीं वयें किती होतीं याची नोंद अगदीं कालपरवांपर्यंत केली जात नसे. ज्या देशांत आयांचीं बाळंतपणाचीं वयें नोंदविलीं जातात त्या देशांत बापाच्या निरनिराळ्या अपत्यजन्माच्या वयांचा कांहींच पत्ता लागत नाहीं. यापेक्षांहि अधिक महत्त्वाची बाब म्हणजे पूर्णत्वास पोंचलेल्या कुटुंबाचा विस्तार व अपत्यसंभवाच्या कालांत विस्ताराचा कालानुक्रम ही होय. ही नोंद करण्याचें महत्त्व पुढारलेल्या देशांत अलीकडेच पटलें आहे.

याच्यापुढची अडचण म्हणजे लोकसंख्येच्या अंकगणिताची रीत होय. संख्यावाढीची सर्वसामान्य रीत मुलींची संख्या व त्यांना संभाव्य स्त्रीलिंगी अपत्यें यावर आधारलेली आहे. (जन्मलेल्या मुलींपैकीं २० वर्षांपर्यंत जगणाऱ्या मुलींचें प्रमाण क्ष आहे व त्या जगणाऱ्या मुलींपैकीं ४०–४५ वर्षांपर्यंत अस्तित्वांत राहणाऱ्या मुलींची संख्या क्ष उणें अ इतकी आहे हा पहिला अंदाज. या अपत्यक्षम स्त्रियांस प्रत्येकीं एकच मुलगी होईल असें मानलें तर लोकसंख्यावाढीचें प्रमाण ( reproduction rate ) १ असें धरलें जातें. अर्थात् प्रत्यक्षांत हें प्रमाण एकापेक्षां अधिक अथवा उणें असूं शकतें. अपत्यसंभव असलेल्या स्त्रियांची संख्या व त्यांना होणार असलेल्या मुलींचें त्या संख्येशीं प्रमाण या अंकगणितांत एका महत्त्वाच्या मुद्याकडे दुर्लक्ष होत असतें. अपत्योत्पादनाचें प्रमाण व मृत्यूचें प्रमाण हीं दोन्हीहि अचलच राहतील असें या हिशेबांत गृहीत धरलें जातें. वास्तविक पाहतां असें गृहीत धरण्यास सबळ असें कारण दिसत नाहीं. तथापि तसें गृहीत धरलें जातें हें खरें. उपरिनिर्दिष्ट संख्यावाढीच्या निर्देशांकाचा अनुभव असा आहे कीं तो अंक खालीवर असे फार हेलकावे खातो. अमेरिकेंत १९३०-४० सालांत हा निर्देशांक एकाच्या खालीं पडला होता. तोच अंक १९५२ सालीं सरळ १·५६ इतका वर चढला. स्त्रियांच्या मातृत्वाच्या कालावधींत जर फार फरक पडला तर ह्या निर्देशांकांत विलक्षण हेलकावे दृष्टीस पडतील.

निरनिराळ्या वयोविभागांतील लोकसंख्याप्रमाणें जर अचल राहिलीं तर तो समाज स्थिर अवस्थेप्रत पोंहोचला असा समज आहे. अशा तऱ्हेची स्थिर अवस्था प्राप्त झालेला समाज जगाच्या इतिहासांत आजतागायत आढळत नाहीं. याचें कारण थोडा विचार केला तर तेव्हांच स्पष्ट दिसतें. लोकसंख्या व तिची वयोविभागणी स्थिर राहावयाची असेल तर अपत्योत्पादनक्षमता ( fertility ) व वयोविभागानुसार मृत्युप्रमाणें स्थिर असावीं लागतात. हीं दोन प्रमाणें स्थिर राहिलीं तर लोकसंख्यावाढीच्या उपरिनिर्दिष्ट निर्देशांकावरून लोकसंख्येचें भविष्य वर्तविणें शक्य होतें. परंतु मौज अशी आहे कीं, अपत्योत्पादनक्षमता स्थिर राहिली तर लोकसंख्येची वयोविभागणी बदलते व वयोविभागणी स्थिर झाली तर अपत्योत्पादनक्षमता बदलते. या कारणाकडे दुर्लक्ष झाल्याकारणानें लोकसंख्याविषयक बरींच भविष्यें खोटीं ठरलीं आहेत.

सत्य असें आहे कीं वर्षानुवार अथवा दशकवार लोकसंख्येचे आकडे घेऊन त्यावर अंकगणित बसविणें व भविष्य वर्तविणें ही रीतच मुळांत समाधानकारक नाहीं. जें कांहीं घडतें तें कुटुंबाच्या एका पिढींत








अथवा अपत्यसंभवाच्या कालपरिच्छेदांत घडतें. तेव्हां संबंध पिढींत किंवा त्या पिढीच्या २० ते ४५ वर्षांच्या परिच्छेदांत काय घटना घडल्या त्याचा अभ्यास करून त्यावर अनुमानें बसविणें अधिक श्रेयस्कर होय. मुलें दोनचार वर्षे अगोदर अथवा दोनचार वर्षे नंतर येऊं लागलीं तर काय परिणाम घडतात त्याची संगति लावणें महत्वाचें आहे. इंग्लंडांत गेल्या पन्नास-शंभर वर्षांचा इतिहास पाहिला तर कुटुंबविस्ताराचें वय खुंटलें आहे अशा कुटुंबांची अपत्य संख्या खालावत आहे असें स्पष्ट होतें. १८६० सालीं लग्न झालेल्या जोडप्याला सरासरी सहा मुलें असत तर १९३० सालच्या जोडप्यांची अपत्यसंपत्ति उतरत उतरत दोनवर येऊन ठेपली आहे. यावरून लोकसंख्या स्थिर होणार असें अनुमान काढावें तर तरुण लोकांचे तारूण्यपदार्पणाची वयोमर्यादाच पडत चालली आहे हें देखील ध्यानांत धरावें लागेल. हल्ली तरी विवाहप्रमाण चढत आहे, लग्नाचें वय पडत आहे व अलीकडच्या जोडप्यांचें अपत्यप्रमाणहि वाढतें आहे असा अनुभव आहे.

---










श्री. य. अ. रायकर

# शामळाजीच्या सान्निध्यांत

( हा लेख बडोदा विद्यापीठांतील पुरातत्व खात्याचें प्रमुख डॉ. बी. सुब्बाराव यांच्या सौजन्यानें प्रकाशित होत आहे. ले० )

उत्तर गुजराथमध्यें साबरकांठा जिल्ह्यांत शामळाजी नांवाचें एक यात्रास्थान आहे. हें साबरमतीची उपनदी मेश्वो हिच्या कांठीं वसलेलें छोटेंसें खेडें असून हिम्मतनगर व मोडासा यांजवरून तेथें जाण्यासाठीं एस्. टी. चे मार्ग आहेत. पुराणांत याचा गदाधर-क्षेत्र म्हणून उल्लेख आढळतो. प्राचीन काळापासून विविध कारणांमुळें या ठिकाणास महत्त्व प्राप्त होऊन याच्या आसमंतांतील प्रदेश पुरातात्विक दृष्ट्या वैशिष्ट्यपूर्ण झालेला आहे. यंदा महाराजा सयाजीराव युनिव्हर्सिटीतर्फे येथें करण्यांत आलेल्या उत्खननामुळें गुजराथच्या व भारतीय शिल्पकलेच्या इतिहासांत नवी भर पडत आहे. सदर लेखांत त्याची माहिती मराठी वाचकांसाठीं मांडण्याचा विचार आहे.

## उत्खननाची पार्श्वभूमि

या भागांत आढळणाऱ्या ऐतिहासिक अवशेषांकडे पुरातत्त्वज्ञांचें लक्ष यापूर्वींहि गेलें होतें. जुन्या इडर संस्थानचे विद्याधिकारी श्री. पी. ए. इनामदार यांनीं १९३५ मध्यें या प्रदेशाची पाहणी करून बऱ्याच अवशेषांची दखल घेतली होती. त्यानंतर डॉ. हरमन गोएट्झ्, डॉ. एम्. आर्. मजुमदार व डॉ. यू. पी. शाह या बडोद्यांतील विद्वानांनी येथील शिल्पकलेचा अभ्यास केला. डॉ. शाह यांना त्यांतील कांहीं अवशेष गुप्तकालीन किंवा त्याहि पूर्वींचे आढळले. मूर्ती, देवळें, कोरीव काम याखेरीज जुन्या विटांचें बांधकाम येथें बऱ्याच ठिकाणीं आढळतें. अशाचपैकीं शामळाजी-जवळ अर्ध्या मैलांवर "देवनी मोरी" या खेड्यांत एक जागा होती. येथें एक उंच टेकडी असून तिच्या लगत मध्यें खोलगट असलेली चौथऱ्यासारखी जागा होती. स्थानिक लोक या टेकडीस "भोज राजानो टिंबो" म्हणजे भोज राजाची टेकडी म्हणून ओळखत. पुरातात्विक दृष्ट्या हें स्थळ महत्त्वाचें ठरेल असा अंदाज व्यक्त केला जात होता. १९५६–५७ मध्यें विद्यापीठांतील पुरातत्त्व खात्याचे श्री. सूर्यकांत चौधरी, यांनीं या विभागाची सूक्ष्म पाहणी केली. येथील विटांचा आकार हें त्यांच्या ऐतिहासिकत्वाचें एक गमक होय. निरनिराळ्या बांधकामांच्या विटा एकाच आकाराच्या म्हणजे साधारणतः १६"×११"×३" अशा आढळतात. हा विशिष्ट आकार क्षत्रप ( शक ) कालीन विटांचा असल्यानें त्यांच्या काळाचा अंदाज येतो. बडोदा, वडनगर वगैरे ठिकाणींहि उत्खननांत याच आकाराच्या विटा सांपडल्या आहेत. इतिहास-संशोधकापूर्वींच ह्या विटांचा शोध करून त्यांचा उपयोग आपापल्या घरांसाठीं करणारे लोक असतात. शामळाजीचीं बरींच घरें अशा ऐतिहासिक आधारावर उभीं आहेत ! पण या चौर्यकर्मामुळें अवशेषांचा नाश होत असला तरी उत्खननासाठीं योग्य स्थळें निवडण्यास एक प्रकारें मदतहि होते. विटांखेरीज, श्री. चौधरी यांना येथें आढळलेलीं मृद्पात्रेंहि पुरातात्विक दृष्ट्या महत्त्वाचीं होतीं. लालभडक मृद्पात्रांचा हा एक विशिष्ट प्रकार ( Red Polished Ware ) गुजराथ-मध्यें वडनगर, बडोदा, तिंबर्वा, अमरेली व सोमनाथ वगैरे ठिकाणींहि आढळतो व त्याचा काळ इ. स. २०० ते ६००च्या दरम्यांतील आहे. इतक्या पुराव्यांवरून देवनी मोरी येथील स्थळ उत्खननास योग्य आहे याबद्दल शंका नव्हती. ही टेकडी बौद्ध स्तूप असावा असा अंदाज डॉ. यू. पी. शाह व श्री. चौधरी यांनीं व्यक्त केला होता. पण येथें बौद्ध धर्माचा पगडा असण्याची शक्यता फार दूरची भासत होती, कारण गुजराथमध्यें सौराष्ट्रखेरीज बौद्ध अवशेष फक्त एकाच ठिकाणीं ( तारंगा येथील तारणमाता ) सांपडले होते. तेव्हां निर्णायक निष्कर्ष उत्खननावरच अवलंबून होते.

यंदा उत्खननास अचानक चालना मिळण्यास निराळें कारण घडलें. शामळाजीजवळ मेश्वो नदीला बांध घालून शेतीला पाणी पुरवठ्यासाठीं चार चौरस मैलाचें "शाम सरोवर" बांधण्याची योजना चालूं आहे. मेश्वो ही अरवली कन्या, साबरकांठा, खेडा व अहमदाबाद जिल्ह्यांतून वहात जाऊन साबरमतीच्या संगतीनें सागरास मिळते. अरवली मूळचा राजस्थानी. पण तो शामळाजीजवळ गुजराथशीं हस्तांदोलन करतो व आपल्या कन्येच्या मार्गांत प्रतिबंध करूं पाहतो. पण तीन

बाजूनें अरवलीनें अडविलेली मेश्वो एका बाजूनें बापाच्या हातावर तुरी देऊन निसटते. बरोबर याच ठिकाणीं तिला धरण बांधण्यांत येऊन शाम सरोवराची निर्मिति होणार आहे. देवनी मोरी येथील वरील ठिकाण या सरोवराच्या नियोजित जागेंतच येत असल्यामुळें बराचसा इतिहास अक्षरशः पाण्यांत बुडणार होता. पण भविष्यकाळ बांधण्यासाठीं इंजिनियर्स भूतकाळावरून बुलडोझर फिरवतील, त्यापूर्वी आपली ऐतिहासिक ठेव जाणण्याची इच्छा कांहीं स्थानिक पुढारी व सरकार यांनीं व्यक्त केली. (नागार्जुनकोंडा येथील उदाहरण अगदीं असेंच आहे.) डॉ. जिवराज मेहता यांच्या प्रेरणेनें आमच्या खात्याकडे हें काम सोपवण्यांत आलें. त्यानुसार खात्याचे प्रमुख डॉ. बी. सुब्बाराव यांच्या मार्गदर्शनाखालीं श्री. चौधरी यांनीं फेब्रुवारी १९६० मध्यें "प्रायोगिक खनन" (trial dig) केलें. सुदैवानें पहिल्याच आठवड्यांत बुद्धमूर्ती व क्षत्रपकालीन नाणीं मिळाल्यामुळें संपूर्ण उत्खनन करण्याची आवश्यकता सिद्ध झाली. केंद्र सरकारकडून यासाठीं रु. ७५०० ची ग्रँट मंजूर झाली व तेवढाच अधिक खर्च बडोदा विद्यापीठानें उचलला. कार्य अधिक शक्तीनें चालूं झालें.

यंदाच्या उत्खननांत संपूर्ण स्तूप व अर्धा विहार खणून झाला व उरलेलें कार्य पुढच्या वर्षी (डिसेंबर–जानेवारींत) चालूं ठेवण्यांत येणार आहे. यांत मिळालेल्या अवशेषांचा अभ्यास अजून चालूं असल्यानें व उत्खनन अपूर्ण असल्यानें, निर्णायक स्वरूपाचे निष्कर्ष आज काढणें शक्य नाहीं. या लेखांत सर्वसामान्य स्वरूपाची महिती देण्यांत येत आहे. या बांधकामाची हानि जबरदस्त झाली आहे. परंतु सर्व रचना भूमितिशास्त्रावर आधारलेली असल्यानें, गणिताच्या साहाय्यानें मूळ बांधणीची अवशिष्ट भागांवरून बरोबर कल्पना करणें शक्य होतें. इतिहास-संशोधनांत व्यवहारी बुद्धि व कल्पनाशक्ति अशा शास्त्रशुद्ध बैठकीवर काम देतात. त्यानुसार मूळ कामाची माहिती व मापें खालीं देत आहे.

## स्तूपाचें स्वरूप

स्तूपाची उंची आज ३७ फूट आढळली तरी त्याची मूळ उंची ४९ फूट ४ इंच असावी. या स्तूपाला एकावर एक असे दोन चौथरे असून त्यावर अण्डाकृति घुमट आहे. पहिला चौथरा– म्हणजे पाया– ८६ फू. ४ इं. रुंदीचा एक चौरस आहे. याची उंची ७ फू. १० इं. असून रुंदी ७ फू. ८ इं. आहे. याचा प्रदक्षिणा पथ म्हणून उपयोग होतो. याच्या चारहि बाजू व कडा नक्षीकामानें सुशोभित केलेल्या आहेत. प्रत्येक उभ्या बाजूस सारख्या अंतरावर बसविलेले १२ अर्धस्तंभ आहेत. हे स्तंभ प्रत्येकी ३ फूट उंचीचे असून त्यांचे शीर्षावरील कोरीव कामांत भारतीय व ग्रीक कलांचा समन्वय आढळतो (Indo-Corinthian Capitals). पहिल्या चौथऱ्यावर दुसरा चौथरा ७१ फूट रुंदीचा चौरस येतो. याची उंची व रुंदी पहिल्या चौथऱ्याइतकीच असणार. याच्या चारहि उभ्या बाजूंवर बुद्धाच्या मूर्ती बसविलेल्या असून त्यांचें भोंवतीं सुशोभित कमानी आहेत. प्रत्येक बाजूस ४ मूर्ती असल्या पाहिजेत. मध्यवर्ती एक कमान नुसतीच असावी. दुसऱ्या चौथऱ्यावर अण्डाकृति घुमट आहे. फक्त घुमटाची उंची ३४ फूट व व्यास ५५ फू. ८ इंच असावा. याचा घाट पहिल्या १६ फुटापर्यंत सरळ व नंतर वक्राकार होत गेलेला असणार. यावर छत्रयष्टि व हर्मिका (कठडा) या गोष्टीहि असाव्या पण त्यांचे अवशेष मिळाले नाहींत. बांधकामाचीं मापें फूट-इंचांत अर्धवट वाटलीं तरी तत्कालीन मापनपद्धतीनुसार तीं योग्यच असणार.

हें काम संपूर्णतः भाजलेल्या मातीचें आहे. मातीच्या बुद्धमूर्ती सर्वच भग्न अवस्थेंत मिळाल्या. फक्त तीनच मूर्ती संपूर्ण सांधणें शक्य झालें. सर्व बुद्ध आसनस्थ ध्यानमुद्रेंत असून अत्यंत सुंदर व रेखीव आहेत. हे सर्व एकाच साच्यांतून काढलेले नाहींत. प्रत्येकांत फरक आहे. या शिल्पकलेवर गांधार कलाशाखेची छाप स्पष्ट कळून येत आहे. एक बुद्ध गांधार पद्धतीची केशरचना असलेला मिळाला. बाकीच्यांची केशरचना भारतीय पद्धतीची (दक्षिणावर्त–लोमराजि) आहे. वायव्य भारतांतील गांधार कलाशाखेचा प्रसार गुजराथपर्यंत झाला होता हें यावरून सिद्ध होतें. नक्षिकाम असलेल्या सुट्या विटा असंख्य आढळल्या आहेत. शिवाय मातीच्या सुशोभित कमानी व चक्रें (terracotta arches with medallions) हें तर येथील कलेचें वैशिष्ट्य दिसतें. एकूण हें सर्वच








काम मातींतील शिल्पकलेचा उत्कृष्ट व वैशिष्ट्यपूर्ण नमुना आहे यांत शंका नाहीं. गुजराथच्या प्रादेशिक कलेचें तें एक वैभव आहे. या स्तूपाचें कांहीं बाबतींत सिंधमधील मिरपूरखास (५ वें व ६ वें शतक) येथील स्तूपाशीं साम्य आहे. मूर्तीवरून हें स्थान महायान पंथाचें असणार हें उघड आहे.

## नजीकच असलेला विहार

एवढ्या मोठ्या धार्मिक केंद्राजवळ बौद्ध भिक्षूंची राहण्याची सोय असलीच पाहिजे. स्तूपाच्या नैर्ऋत्येस ५० फुटांवर विहार म्हणजे मठ आहे. यानें १२० चौरस फूट जागा व्यापली आहे. याच्या मध्यवर्ती चौरस प्रांगण असून चारहि बाजूंनी मिळून एकूण तीस खोल्या आहेत. सर्व खोल्यांचे दरवाजे मधल्या प्रांगणांत उघडतात. उत्तरेस (म्हणजे स्तूपाच्या बाजूला) ६ फूट रुंदीचें प्रमुख प्रवेशद्वार आढळलें आहे. विहारांतील पाणी बाहेर घालविण्यासाठीं भूमीगत ड्रेनेजची व्यवस्था पण आहे. हें सर्व बांधकाम एकाच वेळेचें नाहीं. कालांतरानें झालेली दुरुस्ती व पडलेली भर उत्खनन करतांना स्पष्ट कळून येते. विहाराच्या दक्षिणेस १० फूट रुंदीच्या भिंतीचे अवशेष सांपडले आहेत. ही भिंत नदीपासून रक्षण करण्यासाठीं बांधली असावी. या घरांच्या छपरांविषयीं कांहीं सांगतां येत नाहीं. पण एका बाजूला छिद्र असलेलीं पक्क्या मातीचीं सपाट कौलें सांपडलीं आहेत. हीं कौलें हल्लीच्या मंगलोरी घर्तीचीं आहेत. लोखंडी खिळेहि बरेच सांपडले आहेत. अन्य वस्तूंत नाणीं महत्त्वाचीं आहेत. कांहीं नाणीं शकक्षत्रप विश्वसेन (इ. स. २९४–३०५) याचीं असून कांही मैत्रक–कालीन आहेत.

पश्चिम क्षत्रप म्हणून ओळखल्या जाणाऱ्या शकांचा गुजराथवर अंमल इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापासून तरी खास होता. गुप्त सम्राट चंद्रगुप्त दुसरा (इ. स. ३८०–४१३) यानें त्यांचा पराभव करून गुजराथ व माळवा हे भाग जिंकले. गुप्तसाम्राज्याच्या नाशानंतर ६ व्या व ७ व्या शतकांत सौराष्ट्रांत वलभीच्या मैत्रक राजांचा गुजराथच्या बऱ्याच भागावर अंमल होता. शामळाजीचें हें बौद्ध केंद्र क्षत्रप, गुप्त व मैत्रक काळांत जागृत असावें. मृद्पात्रें, शिल्पशैली, नाणीं वगैरेंच्या आधारें याच्या काळाचा अंदाज बांधता येतो. हा स्तूप प्रथमतः तिसऱ्या शतकांत उभारला गेला असावा व सातव्या शतकाच्या अखेरपर्यंत तो अस्तित्वांत असावा असा अंदाज सध्यां व्यक्त केला जात आहे.

याच्या नाशाचें कारण निश्चित सांगतां येत नाहीं. नैसर्गिक हानि आहेच पण त्याखेरीज त्यांत मानवी अंग असावें, कारण प्रत्येक मूर्तीचें शीर हमखास धडापासून वेगळें आढळतें. या नाशाचा कर्ता कोण असावा हें ठरविणें कठीण आहे. बौद्ध धर्माच्या नाशाबरोबर हा स्तूप नाहीसा झाला असावा. पूर्वी दीर्घकालपर्यंत बौद्ध धर्माचें प्रभावी केंद्र बनलेल्या भूमींत आज स्थानिक लोकांना गौतम बुद्धाची ओळखहि राहिलेली नाही. खणणारे मजूर बुद्ध मूर्ति सापडली कीं "देवली मळी, देवली मळी" म्हणून आश्चर्य व्यक्त करून कोणीतरी देव म्हणून त्याला ओळखत. आजूबाजूचे खेडूत "अंया भगवान क्यां निकळ्या छे ?" अशी भाविक उत्सुकतेनें चौकशी करीत येत व बुद्धाच्या मूर्तीपुढे "कोणीहि अस, पण देव आहेस" अशा अज्ञानमूलक सहिष्णुतेनें लोटांगण घालीत. देव न मानणाऱ्या बुद्धालाच, बौद्ध धर्म न मानणाऱ्यांनीहि देव मानावें हा एक दैवदुर्विलासच होय ! पण या मूर्तीच्या मुखावरील ब्रह्मानंदाचें स्मित म्हणजे मातींतून कलाकारानें निर्माण केलेलें, सौंदर्य व पावित्र्य यांचें निष्कलंक मीलन आहे व तें पाहतांच कोणालाहि यापुढे "सरणं गच्छमि" असेंच म्हणावेसें वाटेल. तें हास्य म्हणजे, जीवनाचें अंतिम ज्ञान झालेल्या बुद्धास भाविकांचें श्रद्धास्थान होणें किंवा अभ्यासूंच्या चिकित्सेचा विषय बनणें यांजबद्दल सारखीच वाटणारी विरक्तीच होय !

## शामळाजीच्या महत्वाचें रहस्य

शामळाजीच्या सातत्यानें टिकलेल्या महत्त्वाचें रहस्य भौगोलिक व आर्थिक कारणांत सापडतें, व तें आजहि आढळून येईल. ऐतिहासिक व्यापारी मार्गावरील शामळाजी हें एक केंद्र होतें. मंडसोर किंवा उज्जयिनीच्या आसमंतांतील प्रदेशावरून भडोच बंदराकडे जाणारा मार्ग डुंगरपूर, भिलोडा, शामळाजी, कपडवंज व नडियाद यांजवरून जात असे. भारताचा परदेशाशीं व्यापार प्रामुख्यानें खुष्कीच्या मार्गानें वायव्य सरहद्दीवरून चाले. पण मौर्य साम्राज्याच्या नाशानंतर







ग्रीक, शक, पार्थियन व कुशाण वगैरेंच्या आक्रमणामुळें हा मार्ग गैरसोयीचा होऊन व्यापार जलमार्गाकडे अधिक वळला. जलमार्गाचें महत्त्व वाढण्यास आणखी एक कारण घडलें. इ स. ४५ मध्यें हिप्पॅलसनें मॉन्सून वाऱ्यांचा शोध लावला. त्यामुळें वाऱ्याच्या विश्वासावर शिडाचीं जहाजें भर समुद्रांतून पार होऊं लागलीं व भारताचा परदेशाशीं व्यापार वाढला. साहजिकच मंडसोर-भडोच मार्ग भरभराटीस येऊन त्यामुळें शामळाजीचें महत्त्व वाढलें असावें. शामळाजीला तीन बाजूंनीं डोंगर असल्यामुळें लष्करी ठाणें म्हणून क्षत्रप काळापासून मान्यता मिळाली. गुप्त काळांत शैव व वैष्णव पंथांचेंहि हें एक केंद्र बनलें. व्यापारी मार्ग हे संस्कृतीचे प्रवाह होतात व त्यामुळें शामळाजी हें व्यापार, कला, धर्म, संरक्षण अशा विविध दृष्टीनें मान्यता पावलें. आजहि गुजराथ, मारवाड व मेवाड यांच्या सांस्कृतिक समन्वयाचें तें केंद्र आहे. शामळाजीचें (म्हणजे शामलालजी श्रीकृष्णाचें) प्रसिद्ध मंदिर १०व्या किंवा ११व्या शतकांतील आहे. येथें दरवर्षी कार्तिक शु० एकादशीपासून वीस दिवस मोठी यात्रा भरते. गुजराथ राजस्थानला जोडणारा नवा " नॅशनल हायवे " शामळाजीवरूनच जात आहे. पूर्वी लष्करी हेतूसाठीं उपयोगांत आणलेली भौगोलिक परिस्थिति आज शेतीच्या विकासासाठीं वापरली जात आहे. जेथें पूर्वी नैसर्गिक रमणीयतेमुळें हिन्दु, बौद्ध धार्मिक लोक आकर्षिले गेले तेथें आज आदिवासींमध्यें कार्य करण्यासाठीं "सर्वोदय केंद्र" निघालें आहे. खिस्ती लोकांच्या नजरेंतूनहि ही जागा सुटली नाहीं. शामळाजीजवळ ५ मैलावर लुसडिया गांवीं चर्च आहे. या लोकांनी आदिवासींमधील धर्मप्रसाराबरोबर रुग्णसेवेचें भरीव कार्य केलें आहे. भूतकाळ व वर्तमानकाळ यांच्यामधील हे दुवे लक्षांत घेण्यासारखे असतात. किंबहुना त्यांच्याखेरीज वर्तमानकाळापासून तुटलेला इतिहास निष्प्रयोजन होतो.

यंदाच्या उत्खननांत सांपडलेले अवशेष बडोद्यास पुरातत्त्व खात्याचे म्यूझियममध्यें ठेवण्यांत आले आहेत. उत्खनन अपूर्ण असल्यानें त्यांच्या अर्थबोधनाविषयीं निर्णायक मतें अजून देतां येत नाहींत हें प्रथमतःच स्पष्ट केलें आहे. या स्तूपाचें एक मॉडेल याच खात्यांतील शिल्पकार श्री. थत्ते सध्यां तयार करीत आहेत. त्यावरून मूळ स्तूपाची तंतोतंत कल्पना कोणासहि येऊं शकेल. गुजराथ राज्याच्या निर्मितीचे वेळीं, गुजराथच्या इतिहासांतील एक अज्ञांत दालन उघडून भारतीय वास्तुकलेच्या इतिहासांत नवी भर टाकणारा हा स्तूप कोणालाहि शुभदायक वाटल्याखेरीज राहणार नाहीं.

## — Bibliography —


1. **Chowdhari S. N.**
" Excavations of a Buddhist Stupa and a Vihar at Devani Mori near Shamalaji– North Gujarat ", Journal of the Oriental Institute, Baroda, June 1960.

2. **Chowdhari S. N.**
" A Torana at Shamalaji ", The Journal of the M. S. University of Baroda, March 1959.

3. **Shah U. P.**
Sculptures from Shamalaji and Roda, Baroda Museum Bulletin, Vol XIII, Baroda, 1960.

4. **सोनी रमणलाल**
प्रकृति–सौन्दर्य अने शिल्प स्थापत्यनुं कलाधाम– शामळाजी मोडासा, १९५९.

5. **इनामदार पी. ए.**
ईडर संस्थानना केटलाक पुरातन अवशेषो. हिम्मतनगर, १९३७.

6. **Subbaro B.**
Baroda Through Ages, M. S. University Archaeology Series No. 1 Baroda, 1953.

7. **Sankalia H. D.**
The Archaeology of Gujarat, Bombay, 1941.

8. **गुप्त, परमेश्वरीलाल**
भारतीय वस्तुकला बनारस, सं. २००३.


---












## वाचकांचा पत्रव्यवहार –

### अर्थशास्त्राचे मराठी पाठ्यग्रंथ व त्यांतील परिभाषा

अर्थशास्त्राची परिभाषा ह्या विषयावरील श्री. पंडित यांचें नवभारताच्या डिसेंबर १९६० च्या अंकांतील दुसरें टिपण वाचून माझी खूपच करमणूक झाली. अर्थशास्त्राची परिभाषा मराठींत निश्चित न झाल्यामुळें अनवस्था प्रसंग ओढवला आहे; तेव्हां ताबडतोब परिभाषा निश्चित व्हावी, किंवा मराठी माध्यमाचा फेरविचार व्हावा ही पंडितांची पहिली भूमिका. ती आतां त्यानी बदलली असून अर्थशास्त्र ह्या नांवाखालीं इंग्रजींत जें खपतें तें शास्त्र नसून 'कथन' (हा त्यांचाच शब्द) आहे व आतां अर्थ-शास्त्राला शास्त्र करून त्याची जोपासना करण्याची जबाबदारी मराठी लेखकांवर आहे अशी भूमिका त्यांनी घेतली आहे. भाषावार राज्यरचनेप्रमाणें आतां भाषावार शास्त्ररचना होणार म्हणावयाची ! ह्या भूमि-केनें करमणूक नाहीं झाली तर दुसरें काय होणार ?

श्री. पंडितांची महत्त्वाकांक्षा कांहीं वेगळीच आहे हें "केवळ भाषांतराची माझी भूमिका नाहीं." असें त्यांनी ठासून सांगितलें आहे ह्यावरून दिसतें. पंडितांच्या ह्या विधानामुळें मराठींतील अर्थशास्त्रविष-यक ग्रंथांचें स्वरूप कसें असावें असा प्रश्न उपस्थित होतो. मराठी हें माध्यम व्हावें पण तें होत असतां "शास्त्राच्या व विद्यार्थ्यांच्या हिताच्या दृष्टीनें" इंग्रजी अर्थशास्त्रीय वाङ्मयाशीं आपला जो संबंध जोडला गेला आहे तो सुटतां कामा नये अशी माझी पहिल्यापासून भूमिका आहे. अर्थशास्त्र हें आतां खूप प्रगत झालेलें शास्त्र आहे व त्याचा परिचय आतांपर्यंत तरी आपल्याला इंग्लिश भाषेंतून झाला आहे. इंग्रजींत आधींच जो विचार व्यक्त झाला आहे तोच मराठींत मांडण्याची जबाबदारी आतां मराठी लेखका-वर पडलेली असल्यानें मराठींत जे पाठ्य ग्रंथ लिहिले जातील त्यांना भाषांतराचें स्वरूप प्राप्त होणें अपरिहार्यच नव्हे तर अवश्य आहे. भाषांतर ह्या शब्दप्रयोगाचा येथें शब्दशः अर्थ घ्यावयाचा नसून एका भाषेंतील विचार दुसऱ्या भाषेंत व्यक्त करणें असा अर्थ घेतला पाहिजे. इंग्रजींत Increase in demand leads to increase in price ह्या किंवा ह्या अर्थाचा दुसऱ्या शब्दांत सांगितलेला सिद्धान्त मागणी वाढल्यास किंमत वाढते ह्या शब्दांत सांगणाऱ्या मराठी लेखकांना पंडितासारख्यानीं 'भाषांतऱ्या' म्हणून हिणवलें तरी त्याची खंत त्यांनीं बाळगूं नये. कारण इंग्रजींत व्यक्त झालेला विचार मराठींत सांगणें हेंच मराठींत पाठ्यपुस्तकें लिहिणारांचें काम आहे. एखादें नवें शास्त्र तयार करणें व त्याची जोपासना करणें हें पाठ्यग्रंथ लिहिणारांचें काम नाहीं व तसें तें असूंहि नये. अर्थशास्त्रावर इंग्र-जींत जे पाठ्यग्रंथ लिहिले जातात त्याबाबत श्री. पंडित काय म्हणतील ह्याची कल्पना मला करतां येते. ते हेंच म्हणतील कीं ह्या लेखकांनीं केवळ precis लिहिण्याचें काम केलें आहे. इतरत्र प्रसिद्ध झालेला मौलिक विचार त्यांनी केवळ सारांशरूपानें मांडला आहे झालें ! स्थूलमानानें पाहातां इंग्रजी पाठ्यपुस्तकांचें स्वरूप Precis चेंच असतें व तसेंच तें असलें पाहिजे. कारण नवें शास्त्र तयार करण्याची जबाबदारी पाठ्य-ग्रंथ लिहिणारांवर नसते. तर विद्यार्थ्यांना समजेल अशा भाषेंत आधींच व्यक्त झालेला विचार समजून सांगणें हेंच त्याचें मुख्य काम असतें. पाठ्यग्रंथांचें वैशिष्ट्य त्यांतील विचारांतील नाविन्यतेंत अगर मौलि-कतेंत नसून त्या विचारांच्या मांडणींत असतें.

इंग्रजींतील अर्थशास्त्रीय वाङ्मयाशीं आपला संबंध निदान सध्यांच्या संक्रमणकालांत तरी राहावा ह्या माझ्या भूमिकेला अनुसरूनच मी माझ्या ग्रंथांत उत्तमोत्तम इंग्रजी प्रतिपाद्य विषयाशीं संबंधित अस-लेलीं अवतरणें देत असतों. माझ्या ग्रंथांतील इंग्रजी अवतरणांबाबत श्री. पंडिताना विलक्षण कुतूहल दिसतें. कारण त्यांचा उल्लेख केल्याशिवाय त्यांचें कोठलेंच टिपण पुरें होत नाहीं. मी इंग्रजी अवतरणें कां देत असेन ह्याबाबत त्यांनी अनेक तर्कवितर्क केले आहेत. मात्र ते करण्यापूर्वी त्याबाबत 'अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें' ह्या माझ्या ग्रंथांत जो खुलासा केला आहे तो पाह-ण्याची तसदी त्यांनी घेतली असती तर त्यांना झालेला बराच मानसिक त्रास वाचला असता. मराठी माध्यमांत अर्थशास्त्राचा अभ्यास करणारानींहि चांगले इंग्रजी ग्रंथ वाचण्याचा प्रयत्न केला पाहिजे असें माझें स्पष्ट मत आहे. अशा ग्रंथांचीं केवळ नांवें देऊन मला काम भागवतां आलें असतें. त्यामुळें माझा त्रास








बांचला असता. पृष्ठसंख्या व किंमत कमी करतां आली असती. पण चांगल्या पुस्तकाचें केवळ नांव सांगण्या-ऐवजीं त्यांतील कांहीं चांगला भाग नमुना म्हणून विद्यार्थ्यांपुढें ठेवल्यास त्यांना मूळ ग्रंथाचें विशेष आकर्षण वाटूं लागतें असा माझा अनुभव असल्यानें अवतरणें देण्याचा मार्ग मी स्वीकारला.

चांगल्या व मान्यवर इंग्रजी ग्रंथांतील अवतरणें देण्याचें दुसरें एक कारण आहे. सध्यां माझ्या डोळ्यासमोर जो विद्यार्थीवर्ग आहे तो मिश्र स्वरूपाचा आहे. त्यांतील बहुसंख्य विद्यार्थ्यांचें इंग्रजी कच्चें असल्यामुळें व तें सुधारण्याची आवश्यकता असल्यानें चांगल्या इंग्रजीचे नमुने त्यांच्यापुढें ठेवतां येतील तेवढे ठेवले पाहिजेत. चांगल्या ग्रंथांतील अवतरणानें हें काम सहजासहजीं साधतें. ( माझ्या स्वतःच्या इंग्रजीची मला खात्री नाहीं म्हणून मी दुसऱ्यांचीं अवतरणें देतों असें म्हणावयाची मोकळीक पंडितांना आहे ! ) मराठी माध्यमांत लिहूं इच्छिणाऱ्यांना ह्या अवतरणांचा कसा उपयोग होतो हें वर सांगितलेंच आहे. इंग्रजी माध्यमाच्या द्वारा जे अभ्यास करूं इच्छितात त्यांनाहि अवतरणांनी युक्त अशा चांगल्या मराठी पुस्तकांचा उत्तम उपयोग होतो. ह्या विद्यार्थ्यांच्या इंग्रजीचाहि दर्जा चांगला नसल्यानें प्रथम विषय मराठींत जाणून घेण्याची इच्छा त्यांना साहजिकच असते. त्या बाबतींत पुस्तकांतील भागाची त्यांना मदत होते. मराठींत समजून घेतलेला विषय इंग्रजीत मांडण्यासाठीं त्यांना अवतरणांची मदत होते. शिवाय अशा अवतरणामुळें पुढील अभ्यासाची दिशा त्यांना समजते. कोणत्याहि पाठ्यपुस्तकाचें कार्य केवळ विषय समजून देणें हें नसून त्या विषयाची गोडी लावणें, त्या विषयाचा अधिक अभ्यास करण्यास विद्यार्थ्यांना प्रवृत्त करणें व त्याची दिशा त्यांना दाखवणें हेंहि असतें. माध्यमाच्या बाबतींत सध्यांचा काल हा संक्रमण-काल असल्यानें इंग्रजी व मराठी अशा दोन्ही माध्यमाच्या विद्यार्थ्यांना उपयोगी पडतील अशा पाठ्यग्रंथांची गरज आहे असें मला व्यक्तिशः वाटतें. अर्थात् विद्यार्थ्यांना उपयोग व्हावा अशा हेतूनें केलेल्या ग्रंथरचनेची श्री. पंडित ' उपयुक्ततावादी ' अशी संभावना करतील ही कल्पना मला आहे. पण दुसऱ्याच्या उपयोगी पडण्यासाठीं कांहीं तरी करणें हाच उपयुक्ततावादी ह्या शब्दाचा अर्थ असेल तर ती संभावना हा गौरवच मानला पाहिजे !

इंग्रजीचा आधार घेऊनच मराठींत शास्त्रीय विषयावर आपल्याला ग्रंथरचना करावयाची आहे. ही दृष्टि परिभाषेच्या बाबतींतहि आपल्याला उपयोगीं पडण्याजोगी आहे. बँक ह्या शब्दासारखे जे शब्द पोरासोरांतहि रूढ झालेले असतील व व्याकरणदृष्ट्या मराठींत खपण्याजोगे असतील त्यांना प्रतिशब्द शोधण्याच्या भानगडींत पडूं नये. पारिभाषिक शब्द बनवण्याचा जेव्हां प्रसंग येईल तेव्हां तो शब्द शक्य तेवढा इंग्रजी शब्दाशीं मिळताजुळता असावा. Bank Rate ह्याला बँकदर म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. बँकरेट संबंधी पंडितांनीं जें भाष्य केलें आहे तें फारच गंमतीदार व परिभाषेसंबंधी त्यांच्या कल्पना विचित्र आहेत हें स्पष्ट करणारें आहे. बँकरेटचा परिणाम झळ लागल्यानंतर होतो व open market operations चा परिणाम होण्याकरितां झळ लागावी लागत नाहीं हें अद्‌भुत ज्ञान पंडितांनीं कोठून पैदा केलें ? कां हें त्यांचें खास मराठी व मराठींत जोपासलेलें अर्थशास्त्र म्हणावयाचें ? पंडितांना अर्थशास्त्र शिकवणें हें माझें काम नसल्यानें ( तेवढा उपयुक्ततावादी मी नाहीं ) बँकरेटचा त्यांनी दर्शवलेला कमकुवतपणा आपण वादाकरितां मान्य करूं. पण हा तथाकथित कमकुवतपणा पारिभाषिक शब्दांतहि व्यक्त झाला पाहिजे हा आग्रह काय म्हणून ? Bank Rate ह्या इंग्रजी शब्दांत तो कमकुवतपणा व्यक्त होतो काय ? पारिभाषिक शब्दाविषयीं श्री. पंडितांची एक विचित्र समजूत अशी आहे कीं पारिभाषिक शब्द वापरल्याबरोबर संबंधित विषयाचें संपूर्ण ज्ञान साक्षात्कार झाल्याप्रमाणें व्हावें ! Trade Cycle साठीं वापरण्यांत येणाऱ्या शब्दानें त्याच्या सर्व अवस्थांची एकदम कल्पना यावी. Bank Rate साठीं वापरण्यांत येणारा मराठी शब्द असा असावा कीं पंडितांच्या आवडत्या Discount Houses चा इतिहास त्यामुळें समजावा, Bank Rate व Open Market Operations मधील फरक समजावा. थोडक्यांत बँकिंगची सर्व कल्पना यावी. ( Bank Rate हें आयुध प्रथम व Open Mar-







ket Operations हें आयुध वापरांत त्यानंतर आलें हें मात्र समजूं नये. कारण पंडितांच्या दृष्टीनें तें सोयीचें नाहीं. ) पंडित मराठींत जें नवें शास्त्र बनवूं पाहात आहेत तें सांकेतिक शास्त्र असावें, म्हणजे ज्या शास्त्रांत थोडया शब्दांच्या आधारें सर्व ज्ञान प्राप्त होतें असें शास्त्र असावें. असें शास्त्र बनवण्याच्या गडबडींत पारिभाषिक शब्द हे प्रामुख्यानें सांकेतिक शब्द असतात ह्याचा श्री. पंडितांना विसर पडणें साहजिकच आहे.

चलन ह्या शब्दावरील पंडितांचें भाष्य चूक आहे. चलन ह्याचा अर्थ पैसा असाच होतो. चलन हा शब्द Currency ह्या अर्थानें रूढ झाला. कारण बराच काळपर्यंत आपल्याला चलनाचा दुसरा कोणताच प्रकार माहित नव्हता हेंच होय. Currency व Money ह्या दोन शब्दांचा उपयोग पैसा ह्या अर्थानें केला जावा हा प्रकार अर्थशास्त्राच्या अभ्यासकाला नवा नाहीं. Quantity Theory प्रथम सांगणाऱ्यांना Currency ज्या प्रमाणांत वाढते त्या प्रमाणांत भाव वाढतात हेंच सांगावयाचें होतें. तरीहि त्यांनीं Quantity Theory of Currency असें म्हणण्याऐवजीं of Money असा शब्दप्रयोग केला. कारण त्या काळांत Currency हाच चलनाचा मुख्य प्रकार होता.

पारिभाषिक शब्द बनवतांना इंग्रजीचा शक्य तेवढा आधार घ्यावा हें वर Bank Rate चें उदाहरण घेऊन मी सांगितलें आहे. पण मराठीची प्रकृतीच वेगळी असल्यानें इंग्रजीचा आधार फार लाभणें शक्य नाहीं. म्हणूनच परिभाषा ठरवण्याच्या तत्त्वांचा व पथ्यांचा विचार करावा लागतो. तो मी नवभारताच्या ऑक्टोबरच्या अंकांत विस्तारानें केलेलाच आहे. सर्व विचार करूनहि चांगला शब्द न मिळाल्यास काय करावें हेंहि ठरवलें पाहिजे. त्यासाठीं Service हा शब्द उदाहरणादाखल घेऊं. 'सेवा' या शब्दावरील पंडितांचा आक्षेप बरोबर आहे. पण दुसरा शब्द न मिळाल्यास सेवा ह्या शब्दाला रूढ अर्थाऐवजीं वेगळा अर्थ देऊन तो अर्थशास्त्रांत रूढ करणें अनुचित नाहीं. शब्दाला शास्त्रांत वेगळा अर्थ प्राप्त होणें ही गोष्ट इंग्रजीत कित्येक शब्दांच्या बाबतींत घडली आहे. ( मी स्वतः 'सेवा' ह्या शब्दाऐवजीं 'कामगिरी' हा शब्द वापरतो. ) कित्येक वेळां प्रथम असमाधानकारक शब्द वापरून मग समाधानकारक शब्दाचा शोध करावा लागतो. Quota ह्या अर्थानें मी वापरलेला घडा ह्या शब्दाबाबत हेंच म्हणतां येईल. त्या शब्दावर पंडितांनीं केलेली टीका मला मान्य आहे. तो शब्द वापरला तेव्हांपासूनच मला असमाधानकारक वाटत होता. तेव्हांपासून मी नव्या शब्दाच्या शोधांत आहे. सध्यां मी 'नियतांश' हा शब्द संस्कृतज्ञांच्या सहाय्यानें निवडला आहे. पण ह्या उदाहरणानें हेंच सिद्ध होतें कीं प्रयोगातूनच परिभाषा ठरत जाते. सुलभ अर्थशास्त्र हा ग्रंथ प्रथम मी जेव्हां लिहिला तेव्हां पैसा हा पंडितांचा अत्यंत आवडता शब्दच मी वापरला होता. पण पैशावर स्वतंत्र ग्रंथ जेव्हां मी लिहूं लागलों तेव्हां पैसा हा शब्द किती असमाधानकारक व अपुरा आहे व चलन शब्द वापरल्यानें बऱ्याच अडचणींचें निवारण कसें होतें ह्याची मला प्रकर्षानें जाणीव झाली. ह्याचा अर्थ असाच होतो कीं मराठींत विपुल लेखन होणें हाच परिभाषा ठरण्याचा मार्ग आहे. मराठींत अर्थशास्त्रावर आतां बरेंच लेखन झालें आहे व प्रयोगावस्था संपली आहे हें पंडितांचें विधान भ्रममूलक आहे. अर्थशास्त्रांत जे विविध उपविषय येतात त्यांतील प्रत्येकावर प्रसिद्ध झालेल्या निदान पांच ग्रंथांचीं तरी नांवें पंडित सांगूं शकतील काय ? आणि प्रयोग हाच शास्त्राचा आधार असल्यानें कोणत्याहि शास्त्राची प्रयोगावस्था संपली आहे असें म्हणणें कधींतरी शहाणपणाचें ठरेल काय ?

तेव्हां पुनः एकदां मला हें स्पष्टपणें सांगितलें पाहिजे कीं अर्थशास्त्राची परिभाषा कृत्रिम मार्गानें व घाईनें निश्चित होणार नाहीं व तशी ती करूंहि नये. सध्यांच्या काळांत एखादी गोष्ट करूं नये किंवा ती होणार नाहीं असें स्पष्ट म्हणण्यापेक्षां झालाच पाहिजे किंवा झालीच पाहिजे अशी घोषणा करणें फारच सोपें असतें हें काय पंडितांना मी सांगितलें पाहिजे ?

शेवटीं परिभाषेचा चिकित्सक अभ्यास होणें अगत्याचें आहे हा विचार मांडल्याबद्दल श्री. पंडितांचें अभिनंदन करतों. पण परिभाषेचा चिकित्सक अभ्यास








होणें निराळें व बसल्या बैठकीवर परिभाषा निश्चित झालीच पाहिजे अशी घाई करणें वेगळें ह्याचा पंडितांना जेवढ्या लौकर उमज पडेल तेवढें बरें ! मराठींतील शुद्धलेखनाचे नियम निश्चित करण्याऱ्या प्रयत्नांची काय परवड होत आहे ती आपल्या डोळ्यासमोर आहेच. त्यांत आणखी भर नको. परिभाषा आवाहनें करून, बैठका भरवून, मतें घेऊन किंवा हें खपवून घेतां कामा नये अशी दमदाटी करून निश्चित होत नसते हें समजणें पंडितांच्याहि हिताचें होईल. कारण त्यामुळेंच ते परिभाषेचा व अर्थशास्त्राचा सखोल अभ्यास करण्यास प्रवृत्त होतील व आपलें अज्ञान असें सहजासहजीं उघड्यावर टाकणार नाहींत.

— व. गो. सहस्रबुद्धे

---

श्री. विनायकराव करमळकर

# प्राचीन द्वारका कोणती ?*

द्वारकापुरी हें भारतवर्षाचें एक प्रसिद्ध वैष्णवतीर्थ आहे. मोक्षदायक सप्तपुरींत त्याची गणना होते. पश्चिमेचें हें महाधाम म्हणजे, आमच्या गुर्जरबंधूंच्या गौरवाचा विषय होय. भगवान् श्रीकृष्णांच्या जीवनलीलास्थळांपैकीं हें एक मुख्य स्थळ असून याचें महत्त्व अनन्यसाधारण आहे. सध्यां ओखामंडळमध्यें असलेली द्वारका हीच कृष्णपुरी का ?

प्रस्तुत प्रश्नाबाबत पुरातत्त्ववेत्त्यांत मतभेद आहेत. या संबंधीं निर्णयतात्मक अद्यापहि कांहीं ठरलेलें नाहीं. मुंबई गॅझेटियरमधील गुजरातचा इतिहास लिहिणाऱ्या विद्वान् लेखकांनीं द्वारका पंजाबमध्यें असावी असा संभ्रम एका ओझरत्या पौराणिक उल्लेखावरून केलेला आहे. यावर इंडियन अँटिक्वेरीच्या जून १९२५ च्या अंकांत याच विषयावर एकमात्र विचारपूर्वक लिहिणारे पुरातत्त्वज्ञ कै. वा. डॉक्टर अनंतराव आळतेकर लिहितात—"प्राचीन द्वारका समुद्रांत बुडाली असल्यानें आज विविध ठिकाणें द्वारका म्हणून समजण्यांत येतात; पण या प्रश्नाचा निर्णयात्मक उकल अद्याप झालेला नाहीं. इतकें मात्र खरें कीं आधुनिक द्वारका म्हणून जो भूमिभाग दाखविला जातो तें मात्र प्राचीन द्वारकास्थान नाहीं." याबद्दल ते सबळ पुरावा देत असल्याचें प्रसिद्धच आहे. बरें, हल्लीं तथाकथित जुनी द्वारका म्हणून जीं स्थळें सांगण्यांत येतात त्यांपैकीं एकहि आधुनिक द्वारकेला आपल्या स्थानापासून पदभ्रष्ट करण्यासारखें नाहीं हीहि गोष्ट तेवढीच खरी आहे. किमान म्हणजे या स्थळांचा हा दावा सर्वमान्य झालेला नाहीं. प्राचीन संस्कृतसाहित्यांत द्वारकेसंबंधीं जे कांहीं उल्लेख आलेले आहेत त्यांचा सर्वंकष विचार झालेला नाहीं, ही खरी वस्तुस्थिति आहे. या प्रकरणीं जुन्यांत जुनें आद्य ऐतिहासिक आदिकाव्य म्हणजे महाभारत व प्राचीन पुराणें यांमध्यें द्वारकेसंबंधीं जे उल्लेख आले आहेत त्यावरूनच सध्यां तरी यासंबंधीं काय समजून घ्यावयाचें तें घेतलें पाहिजे. (यास उपोद्बलक असा उत्खननाचा कांहीं आधुनिक पुरावा मिळेल तर तो हवाच आहे.) सध्यां तरी प्राचीन द्वारका निश्चित करावयाचा हाच सर्वमान्य मार्ग होय. प्राचीन द्वारका आनर्तांत सागराजवळ असल्याचे जसे पौराणिक उल्लेख आहेत तद्वतच ती रैवतक पर्वताच्या आसमंतांत असल्याचे उल्लेख आहेत.

महाभारत आदि, सभा, मौसलपर्व, हरिवंश, वायुपुराण यांत असलेले हे उल्लेख व भागवतादि पुराणांतरीचे उल्लेख हे एकाकी तर दुसऱ्या संदर्भांतील हरिवंश, विष्णुपुराण, भागवत यांतील द्वारकास्थळांचें वर्णन सविस्तर आहे. (ब्रह्मवैवर्त पुराण हें भागवतानंतरचें असल्यानें व तें भागवतास अनुसरणारेंच असल्यानें या ठिकाणीं तें स्वतंत्र जमेस धरण्यासारखें नाहीं.)

### कुशस्थली हीच द्वारका

महमूद गझनवीबरोबर इ. स. १०२४ च्या सुमारास अल्बेरुणी हिंदुस्थानांत आला होता; हा त्याचा काळ ९७३ ते १०४८. त्यानें आपल्या तारिख अल हिंदमध्यें मत्स्य, आदित्य, वायुपुराणें पाहिलीं असल्याचा उल्लेख केला आहे. याबद्दलचें विल्सन यांचें मत, पुराणें १०३५ नंतरचीं होत. अर्थातच त्यांचें हें मत ग्राह्य धरतां येत नाहीं. विष्णुपुराण, भागवत जर अल्बेरुणी भेटपूर्व होत तर हरिवंश हा या उपरोल्लिखित दोन्हीं पुराणांच्या पूर्वीचा असल्यानें अधिक प्राचीन होय. (हरिवंश अध्याय १० श्लोक ३१-३६)

शर्याते मिथुनं चासीदानर्तो नाम विश्रुतः ॥ ३१ ॥
पुत्रः कन्या सुकन्याख्या या पत्नी च्यवनस्य ह
आनर्तस्य तु दायादो रेवो नाम महाद्युतिः ॥ ३२ ॥

* पुरातत्त्व चौमासिक— १९२६ लेखाचें आधारित.

आनर्तविषयश्चासीत्पुरी चास्य कुशस्थली
रेवस्य रेवतः पुत्रः ककुद्मी नाम धार्मिकः ॥ ३३ ॥
ज्येष्ठः पुत्रशतस्यासीद्राज्यं प्राप्य ककुस्थलीम्
सुकन्यासहितः श्रुत्वा गांधर्वब्रह्मणाऽन्तिके ॥ ३४ ॥
मुहूर्तभूतं देवस्य गतं बहुयुगं प्रभो
आजगाम युवैवाय स्वां पुरीं यादवैर्वृताम् ॥ ३५ ॥
कृतां द्वारावतीं नाम्ना बहुद्वारां मनोरमाम्

यानंतर विष्णु पुराण चतुर्थ अंश अध्याय १ मध्यें सारी हीच कथा आहे. वायुपुराणांतील अध्याय ८६ मध्येंहि हीच कथा श्लोक २३ ते २७ मध्यें असून रेवताचा मुलगा रैवत ककुद्मी हा आपली मुलगी रेवती इला वर शोधनार्थ ब्रह्मलोकीं गेला असतां, तेथील गाणें बजावणें नृत्य यांत थोड्याच कालांत समरसून गेला. मग त्यानें आपल्या मुलीस सुयोग्य वर सांगण्याबद्दल ब्रह्मदेवाची प्रार्थना केली असतां, इकडे मर्त्यलोकांत या गोष्टीस युगें लोटल्याचें ब्रह्मदेवानें त्याच्या निदर्शनास आणलें; व "आपल्याच कुशस्थलीला यादवांनीं आक्रमित करून, तीस कित्येक मोठ्या वेशी (प्रवेशद्वारें) बांधून तिचें नांव द्वारावती पडलेलें तो पाहता झाला", असें वर्णन आहे.

आजगाम युवा चैव स्वां पुरीं यादवैर्वृताम् ।
कृतां द्वारावतीं नाम बहुद्वारां मनोरमाम्
—(वायुपुराण अध्याय ८६, श्लोक २७).

ब्रह्मदेवाचे सांगण्यावरून रैवतानें आपली मुलगी रेवती बलरामाला दिल्याचा जो उल्लेख आहे तींत पुरातन कुशस्थलीलाच, सांप्रत द्वारका संबोधण्यांत येतें असा श्लोक आहे. (विष्णुपुराण चतुर्थ अंश, प्रथमाध्याय श्लोक ९१):

कुशस्थली या तवभूपरम्या ।
पुरी पुराऽभूदमरावतीव ॥
सा द्वारका सम्प्रति तत्र चास्ते
स केशवांशो बलदेव नामा
—(वि. पु. ४ अंश, अ. १ श्लो. ९१).

[महाभारताच्या एका प्रतींत 'रम्या'चे जागीं 'शून्या' असा पाठभेद भांडारकर इन्स्टिट्यूटच्या प्रतींत आढळून आला. हा पाठभेद सदर प्रतीच्या कालीं कुशस्थली ओसाड, खंडहर असल्याचे ज्ञानाचा आहे; तो यथार्थत्वानें लेखकास ज्ञात असावा का ? ]

महाभारतांतहि कृष्णानें जुन्या कुशस्थलीचें द्वारका नामकरण केल्याचें म्हटलें आहे. महाभारतान्तर्गत सभापर्वांत जरासंधाचे दबावामुळें आपणांस मथुरेचा त्याग करून द्वारावती कशी वसवावी लागली याचें वर्णन, तो युधिष्ठिरास सांगत असल्याचें महाभारतकारांनीं कृष्णाच्या तोंडीं घातलें आहे. या श्लोकांत जुनी द्वारका कोठें असावी याचें साद्यंत वर्णन असल्यानें ते महत्त्वाचे आहेत म्हणून सर्व श्लोकांचा उताराच येथें देणें इष्ट आहे :

जरासंधभयादेव प्रतीचीं दिशमाश्रिताः ॥ २५ ॥
ततो वयं महाराज तं मंत्रं पूर्वमंत्रितम्
संस्मरन्तो विमनसो व्यपयाता नराधिप ॥ ४७ ॥
पृथक्त्वेन द्रुता राजन्संक्षिप्य महतीं श्रियम्
प्रपतामो भयात्तस्य सधनज्ञातिबान्धवाः ॥ ४८ ॥
इति सञ्चिंत्य सर्वे स्म प्रतीचीं दिशमाश्रिताः
कुशस्थलीं पुरीं रम्यां रैवतेनोपशोभिताम् ॥४९॥
पुनर्निवेशनं तस्यां कृतवन्तो वयं नृप
तथैव दुर्गसंस्कारं देवैरपि दुरासदम् ॥ ५० ॥
स्त्रियोऽपि यस्यां युध्येयुः किं पुनर्वृष्णिपुंगवाः
तस्यां वयममित्रघ्न निवसामोऽकुतोभयाः ॥ ५१ ॥
आलोक्य गिरिमुख्यं तं माधवीतीर्थमेव च
माधवाः कुरुशार्दूल परां मुदमवाप्नवम् ॥ ५२ ॥
एवं वयं जरासन्धादादितः कृतकिल्बिषाः
सामर्थ्यवन्तः संबन्धाद्भवन्तं समुपाश्रिताः ॥ ५३ ॥
त्रियोजनायतं सद्म त्रिस्कन्धं योजनादधि
योजनान्ते शतद्वारं विक्रमक्रमतोरणम् ॥ ५४ ॥
वयं चैव महाराज जरासंधभयात्तदा
मथुरां संपरित्यज्य गता द्वारावतीं पुरीम् ॥ ५५ ॥
— महाभारत, सभापर्व अ० १३

या विस्तृत उताऱ्यांत द्वारका समुद्रांत बेट म्हणून किंवा समुद्राच्या आसमंतात् असल्याचा बिलकूल उल्लेख नाहीं; पण उलट ती रैवतक पर्वताजवळ असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. "रैवतेनोपशोभिताम्" या पदावरून ती रैवतक पर्वताच्या पायथ्याशींच असावी, ती देवांनाहि जिंकण्यास दुराराध्य व जींत राहून स्त्रिया

देखील परचक्रास यशस्वीरीत्या तोंड देऊं शकतील या वर्णनावरून तर पर्वतावरील अभेद्य किल्ल्याचेंच सूचन होतें, आणि या संदर्भांत सर्व आनर्त देशांत जुनें रैवतक म्हणजेच आजचें गिरनार पर्वतावांचून दुसरें स्थळच कोणतें होऊं शकतें ? हा विचारणीय प्रश्न आहे !

## आणखी कांही पुरावे

यासंबंधीं दुसरा उपोद्बलक पुरावा सुभद्राहरणाचा होय. अर्जुन तीर्थयात्रा करितां करितां प्रभासक्षेत्रीं येतो व तेथून द्वारकेस येऊन कपटवेषांत कृष्णभगिनी सुभद्रेचें हरण करतो. अर्जुनाच्या त्रिदंडी संन्यासाची कथा भागवत दशमस्कंद अध्याय ८६ व महाभारत परिशिष्ट, कुंभकोणम् प्रत यांत आलेली आहे.

महत्यां देवयात्रायां रथस्थां दुर्गनिर्गताम् ।
जहारानुमतः पित्रो कृष्णस्य च महारथः ॥९॥
रथस्थो धनुरादाय शूरांश्चारुन्धतोभटान् ।
विद्राव्य क्रोशतां स्वानां स्वभागं मृगराड् इव ॥१०॥
ततः संवादते तस्मिन्ननुज्ञातो धनंजयः ।
गतां रैवतके कन्यां विदित्वा जनमेजय ॥१॥
वासुदेवाभ्यनुज्ञातः कथयित्वेति कृत्यताम् ।
कृष्णस्य मतमाज्ञाय प्रययौ भरतर्षभः ॥२॥
रथेनकाञ्चनाङ्गेन कल्पितेन यथाविधि ।
सैन्यसुग्रीवयुक्तेन किङ्किणीजालमालिना ॥३॥
सर्वशस्त्रोपपन्नेन जीमूतरवनादिना ।
ज्वलिताग्निप्रकाशेन द्विषतां हर्षघातिना ॥४॥
संनद्धः कवची खड्गी बद्धगोलाङ्गुलिभवान् ।
मृगयाव्यपदेशेन यौगपद्येन भारत ॥५॥
सुभद्रात्वथ शैलेन्द्रं अभ्यर्थ्य सहरैवतम् ।
दैवतानि च सर्वाणि ब्राह्मणान्स्वस्ति वाच्य च ॥६॥
प्रदक्षिणं गिरिं कृत्वा प्रययौ द्वारकां प्रति ।
तामभिद्रुत्यकौन्तेयः प्रसह्यारोपयद्रथम् ॥७॥
तत सः पुरुषव्याघ्रस्तामादाय शुचिस्मिताम् ।
रथेनाकाशगेनैव प्रययौ स्वपुरंप्रति ॥८॥

– महाभा. आदि. अ. २१२ ( कुम्भकोणम् )

या वर्णनावरून रैवतक पर्वत द्वारकेच्या अगदीं निकट असावा हेंच अनुमान होतें. प्रतींतील एतत्संदर्भ आवश्यक श्लोक खालीलप्रमाणें आहेत.

कुम्भकोणं प्रत, महाभारत ( भांडा. इन्स्टि. ) परिशिष्ट १, ४६० श्लोकांत विस्तृत दिली आहे.

क्षोभयित्वा पुरुश्रेष्ठं गरुत्मानिव सागरम्
प्रेक्षन्रैवतकं द्वारं निर्ययौ भरतर्षभः ॥
शासनात्पुरुषेन्द्रस्य बलेन महता बली
गिरौ रैवतके नित्यं बभूव विपृथुश्रवाः ॥
प्रवासे वासुदेवस्य तस्मिन्हलधरोपमः
संबभूव तदा गोप्ता पुरस्य पुरवर्धनः ॥
प्राप्य पांडव निर्याणं निर्ययौ विपृथुश्रवाः ॥ ४०० ॥
निशम्य पुरनिर्घोषं स्वमनीकमचोदयत्
सोऽभिपत्य तदाध्वानं ददर्शपुरुषर्षभम् ॥
निःसृतं द्वारकाद्वारादंशुमन्तमिवाम्बुदात्
सविद्युतमिवाम्भोदं प्रेक्ष्य बाणधनुर्धरम् ।
प्रार्थमासाद्य योधानां विस्मयः समपद्यत ॥ ४०५ ॥

अर्जुन शिकारीच्या निमित्तानें रैवतक पर्वतावर जातो, सुभद्रेनें सर्व देवांची त्याचप्रमाणें रैवतक पर्वताची पूजा केली, ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून, पर्वताची प्रदक्षिणा करून ती द्वारकेकडे परत फिरत असतां अर्जुनानें सुभद्रेला बलपूर्वक रथावर खेंचून घेतलें. ( अध्याय २१२ ) म० भा० आदिपर्व

रैवतक पर्वतावर द्वारकेचा जो रक्षक होता त्यानें, अखिल द्वारकेंत खळबळाट माजवून द्वारकेच्या वेशीबाहेर येतांना अर्जुनास (पार्थास) पाहिलें. यावरून द्वारका रैवतक ( गिरनार ) पर्वताच्या पायथ्याशींच असली पाहिजे, या विधानासच बळकटी येते. रैवतक पर्वतावरील जो अभेद्य किल्ला त्याच्याबाहेर येऊनच खालीं द्वारका शहरांत माजलेला खळबळाट द्वारकारक्षकास (गोप्ता) दिसणें शक्य होतें.

महाभारतांतील वरील उतान्यावरून एवढी गोष्ट मात्र असंदिग्धरीत्या दृष्टोत्पत्तीस येते कीं, काठियावाडमध्यें प्राचीनकालीं रैवतक पर्वताजवळ कुशस्थली नगर होतें व पुढें जरासंधाच्या उपद्रवामुळें यादवांना जेव्हां मथुरेचा त्याग करून दक्षिण पश्चिमेकडे पळावें लागलें तेव्हां त्यांनीं ह्या सुंदर व सुरक्षित कुशस्थली नगरीची पुनर्रचना केली; व रैवतक पर्वतावरच एक अभेद्य किल्ला बांधला. यादवांच्या या मथुराबहिर्गमनाची कथा अत्यंत जुनी असावी.

भगवान् बुद्धपूर्व म्हणजे साधारणतः २॥-३ हजार वर्षपूर्व मगधाचा दरारा एवढा वाढला होता कीं, यादवांना व्रज-गोकुळ (मथुरावृंदावन) सोडून पश्चिमेकडे हटावें लागलें.

## बेट कां समजलें गेलें ?

मग द्वारका, बेट किंवा बंदर होतें ही गोष्टच कशी प्रसृत झाली ? हा विचारणीय प्रश्न आहे. विष्णुपुराणाच्या चौथ्या अंशामध्यें ही गोष्ट नाहीं. हा भाग अगदीं जुन्यांतलें जुनें पुराण म्हणजे वायुपुराणांतून घेतलेला आहे. बरें ! वायुपुराणांतहि द्वारका बेट असल्याचें सुतराम् वर्णन नाहीं; आणि विष्णुपुराणान्तर्गत पांचव्या अंशांत कृष्ण चरित्रांतील जें द्वारका वर्णन आहे तें महाभारतांतील सभापर्वीय जो उतारा मागें उद्धृत केला आहे त्याहून कितीतरी भिन्न आहे हें पाहण्यासारखें आहे.

महाभारतांत कालयवनाचा नामनिर्देशहि नाहीं; पण विष्णुपुराणांतहि अगदीं नवीनच कथा आलेली आहे.

> कृष्णोऽपि काल्यवनं ज्ञात्वा केशिनिषूदनः
> जरासंधभयाचैव पुरीं द्वारावतीं ययौ ॥ ३५ ॥

इचा तात्पर्यार्थ असा कीं, परस्परविरुद्ध बाजूंनीं कालयवन व जरासंध यादवांवर आक्रमण करण्याचा बेत करतात, अशा स्थितींत कोणा एकाशीं सामना द्यावा व निर्बल झाले तर दुसऱ्याकडून निश्चित पराभवच व्हावयाचा या आपत्तींतून पार पडावयाकरितां एखाद्या सुरक्षित जागीं अभेद्य किल्ला बांधावयाची योजना कृष्णाच्या पोक्त विचारानें ठरविली गेली. ज्या ठिकाणीं यादव वीर राहोच सामान्य स्त्रियाहि शत्रूपासून आपला बचाव करूं शकतील म्हणून श्रीकृष्णानें समुद्रापासून १२ योजनभूमि मागितली व तेथें द्वारका नामक नगरी बसविली. इत्यादि. इत्यादि.

— विष्णुपुराण पंचम अंश, अध्याय २३

हरिवंशांतहि यादव मथुराप्रदेश सोडून सिंधु देशांत गेले. (राजपुताना मरुभूमींत त्यावेळीं समुद्र असावा कां ?) "तत्र रैवतको नाम पर्वतो नाति दूरतः।" व "तेथें रैवतक पर्वतापासून फारशा दूर नसलेल्या एका चांगल्या जागीं, समुद्र कांठीं द्वारकानगरी वसविते झाले" असें म्हटलें आहे.

— विष्णुपर्व, हरिवंश २ अ. ५६ श्लोक २६-२९

संस्कृत साहित्यांत समुद्राकांठीं द्वारका असल्याचा पहिला दावा हरिवंश रचनाकारास द्यावा लागेल. भौगोलिक द्वारकेचें स्थान पूर्ण, छानबीन केल्यावाचून व महाभारतकारांच्या वर्णनाशीं (रैवतक पर्वताशीं) सामंजस्य टिकविण्याकरितां वा विरोध टाळण्याच्या हेतूनें रैवतक पर्वतपासून 'नातिदूरे' ही शब्दयोजना हेतुपूर्वकच आहे हें उघड होय.

भागवत पुराणाची रचना या इतर (वैष्णव) पुराणांच्या मानानें आधुनिक असल्याचें सर्वमान्यच असल्यानें विष्णुपुराणांतील उपरिनिर्दिष्ट कथाप्रसंगाच्या अनुवादाचे श्लोक देण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं.

ह्या व इतर एतद्विषयक आधारांचा हंसनीरक्षीरन्यायानें विचार करतां एक मुख्य गोष्ट जी सर्वांत प्राचीन अशा महाभारतीय आधारानें सुनिष्पन्न होते ती ही कीं, "द्वारका रैवतक पर्वताच्या पायथ्याशीं असली पाहिजे." महाभारतीयवर्णन अतिशयोक्तिनिरपेक्ष, स्वाभाविक व ज्यांत कृष्णाच्या अवतारित्वाचा मागमूसहि नाहीं असें आहे.

## संगति कशी लावणार ?

महाभारताच्या या अत्यंत प्राचीन चतुर्थांशाच सभापर्वास इतर पुराणांचा टेका आहेच. अर्थातच एक वायुपुराण सोडून त्या मानानें अर्वाचीन पुराणांत इतर बराचसा प्रक्षिप्त—एतावता अनैतिहासिक भाग मागाहून जोडण्यांत आल्याचें दिसतें.

१. हरिवंश, द्वारका सिंधुदेशांत सांगतो.

२. विष्णुपुराण, द्वारकेची वसति सागरापासून द्वादश योजनें दूर सांगतें.

३. भागवत, द्वारकाबेट समुद्रांतच होतें म्हणून सांगतें. यांची संगति कशी लावावयाची हा एक पेंचप्रसंगच आहे.

महाभारत व वायुपुराणांचे जुने संदर्भ रैवतक पर्वत व त्याच्या पायथ्याशीं असलेल्या प्राचीन कुशस्थलीबद्दल आहेत. कालौघांत ही कुशस्थली पूर्ण नाहींशी झाली व तिचे भग्नावशेष राहिले. मथुरा सोडून यादव










आनर्तात आले; त्यांना रैवतक पर्वताच्या पायथ्याशीं हे भग्नावशेष दिसले पण स्थळ बरें वाटलें व जर पर्वतावर एखाद्या चांगल्या किल्याची बांधणी झाली तर खालच्या जागेस सुरक्षितता येईल असें वाटून त्यांनीं त्याच जागीं सुंदर नगर वसविलें, व त्यास बऱ्याच भव्य वेशी असल्यानें त्याचें द्वारका किंवा द्वारावती नामाभिधान केलें. असो.

[ प्रभास क्षेत्रीं यादवी होऊन सर्व यादवकुल नामशेष झालें. सर्व ज्ञातीचा कुलक्षय, बलरामाचें प्रायोपवेशन व जराव्याधाचा बाण लागल्याचें निमित्त होवून भगवान् कृष्णाचें निजधामगमन व द्वारकेची पुढील निरवानिरव व्यवस्था, या संबंधीं जे श्लोक भागवतकारांनीं श्रीकृष्णाच्या तोंडीं घालून, दारुकाकरवीं जो **निरोप** द्वारकेस पाठविला त्यावरूनच द्वारका समुद्रांतीलच बेट असल्याचें व सागरापासून जवळपास असल्याचें ना शाबित नाहीं कां होत ? हा निरोप सांगावयाचें मुख्य प्रयोजन ती **समुद्रापासून बरीच दूर** आहे व दारुकास पायीं प्रवास करावयाचा आहे हा ध्वनि यांत स्पष्ट नाहीं कां ? ]

## नंतरचे गिरिनगर व जीर्णदुर्ग

यादव कालानंतर पुन्हां एकदां हें स्थळ उजाड झालें पण लष्करीदृष्ट्या या स्थळाचें असलेलें महत्त्व तज्ञ माणसाच्या लक्षांत सहजच येण्यासारखें असल्यानें चंद्रगुप्त मौर्य वा तत्पूर्व कोणा नंदवंशीय राजानें परत वसविलें असावें; व मग त्याचें नांव गिरिनगर पडलें; हें इसवीसन द्वितीय शतकांतील महाक्षत्रप जो रुद्रदामन त्याचा गिरनारवर जो शिलालेख उपलब्ध झाला आहे त्यानें दिसून येतें. इ. स. पूर्व ४ शतक ते इ. सनानंतर ५ वें शतकापावेतोंची याची महनीयता किंवा भरभराट सुदर्शन तलावावर असलेल्या रुद्रदामन व स्कंदगुप्त यांच्या प्रशस्तीवरून कळून यावयासारखी आहे. पुन्हां पुढें कांहीं अज्ञात कारणानें हें नगर कालकोपभाजन झालें. सुदर्शन तलाव व गिरीनगर विस्मृतीच्या गर्तेत पडून त्याचें नांव-निशाण म्हणून कांहीं राहिलें नाहीं. डोंगरावर एक पडका किल्ला होता यावरून त्याच्या पायथ्याशीं असलेलें शहर जीर्णदुर्ग झालें तेंच आजचें जुनागड होय. यावरून कुशस्थळी, द्वारका, गिरिनगर, जीर्णदुर्ग व जुनागड हा भूमिभाग थोड्याफार फरकानें एकाच जागेस अनुलक्षून असलेला आहे हें सूज्ञांच्या लक्षांत येईल. ( हें मूळ लेखन तर्कावरच अधिष्ठित असलें तरी तो तर्क सुप्रतिष्ठित आहे वा कसें हें ठरविणें पुरातत्त्ववेत्त्यांचें काम आहे ).

काठियावाड नीट वसविलें गेल्यानंतर वैष्णवांना तर द्वारकेचा पत्ताच लागेना. गिरनारच्या पायथ्याशीं तर त्यावेळीं गिरिनगर असल्याचाच दाखला होता. याबद्दल या काळांत पौराणिक ( मागील ) संदर्भावरून द्वारका समुद्रांत बुडाली ही निश्चित कल्पना प्रसृत पावली असावी व म्हणूनच महाभारतांत खास म्हणजे मौसलपर्व अध्याय ८ मध्यें तसा उल्लेख आढळतो. ( समग्र महाभारताची रचना एका काळची नाहीं हें सर्वसम्मतच आहे ) याचाच अनुवाद पुढें हरिवंश, विष्णुपुराण व भागवतांत थोड्याफार फरकानें करण्यांत आल्याचें दिसतें. परमभागवत गुप्तकालीन राजे लोकांना याबद्दल मनांत अत्यंत खंत वाटे. गिरनारच्या पायथ्याशीं असलेलें गिरिनगर हीच प्राचीन द्वारका ही गोष्ट ते अजिबात विसरले व आपलें इ. स. पूर्व द्वितीय शतक किंवा त्याच्या आगेमागें रचलेल्या हरिवंशांत द्वारका समुद्रकांठीं असलेल्या किंवा दन्तीच्या आधारावर, ज्याप्रमाणें सुदर्शन तलावाच्या कांठीं स्कंदगुप्तानें विष्णुमंदिर बांधलें त्याचप्रमाणें कोणा वैष्णव राजानें आजच्या द्वारकेच्या जागीं कृष्णमंदिर बांधलें असावें असा तर्कच करावा लागतो. मौसलपर्वांत समुद्र द्वारका बुडवील हें भाकित आहे; पण मंदिराचा उल्लेख नाहीं; कारण त्यावेळीं तें बांधलें गेलेंच नव्हतें ! विष्णुपुराण व भागवतांतील एक " श्रीमद्भगवदालया " शिवाय बाकीची द्वारका भगवान् श्रीकृष्णाच्या निजधामगमनानंतर समुद्र घशांत घालील एतद्विषयक श्लोक ओघानेंच घातले गेले. हे श्लोक सुविद्य लोक जाणतातच; म्हणून उद्धृत करण्यांत स्वारस्य नाहीं. हें मंदिर अर्थातच अल्बेरुनीच्या काळपूर्व ( सन १०३० ) होतें हें मात्र निश्चित होय.

ज्या ठिकाणीं आज ओखामण्डल आहे त्याजागीं पूर्वकालीं विष्णु मंदिर बांधल्यावर त्या जागेस पावित्र्य आलें पण द्वारकानगराची वस्ती मात्र नंतरचीच.

श्रीकृष्णालय सागराच्या तडाख्यांतून वांचल्याची गोष्ट विष्णुपुराणांत व भागवतांत मात्र आहे. पुढें पुढें द्वारका बेटासहि पावित्र्य आलें. बेटांतील शेख (शेष) नारायणाची मूर्ति प्राचीन गुप्त कालांतील असण्याचा संभव आहे. विष्णुपुराणांत या अन्तर्द्वीपाचा उल्लेख नाहीं पण भागवतांत तो आहे. बेट द्वारका हें समुद्रांतील अन्तर्द्वीपच होय. महाभारताच्या कांहीं प्रतींत–उदाहरणार्थ कुम्भकोणम् प्रत, सुभद्राहरणाच्या पर्वांत या अन्तर्द्वीपाचा उल्लेख आहे; यावरून हा अध्याय त्यांत मागून घातलेला आहे हें उघडच होय; नाहीं म्हणायला वनपर्वांत तीर्थयात्रा प्रसंगांत जो द्वारकेचा उल्लेख दिसतो तो भौगोलिक द्वारका पाहिल्यावांचून केवळ सांगोवांगींच असावा; सबब त्याची दखल घ्यावयास नको. कारण चार धामापैकीं, एक तीर्थस्थान म्हणून जी द्वारकेची प्रशस्ति आहे, ती बाराव्या शतकांतील असल्यानें द्वारका शहर त्यापूर्व फार तर शे दोनशें वर्षें वसलें असेल. टॉलेमीचा काल खिस्तपूर्व २८५ ते २४७, मौर्य सम्राटाचे पदरीं याचा वकील होता. तो ( Barake ) बंदर म्हणून आपल्या कालीं उल्लेख करतो, तो द्वारकेबद्दल वा प्रभासवेरावळबद्दल ? इ. स. पूर्व दुसऱ्या शतकांत समुद्रकांठीं द्वारका असल्याचा उल्लेख असलाच तर तो हरिवंशांत आला असेल; त्यावेळीं कदाचित् समुद्रकांठीं चांचे लोकांची वस्ती असावी; व ते आपली उपजीविका समुद्रावर वाटमारी करून करीत असावेत. Barake of Arrian again is undoubtedly Dwaraka हें डॉ. अळतेकर यांचें ठासून सांगणें काय आधारावर आहे हें कळण्यास दुर्दैवानें आतां मार्ग राहिला नाहीं. Indian Antiquary चे उल्लेखांत ते म्हणतात “ सध्याची द्वारका ही खिस्तपूर्व १२०० म्हणजे भारतीय युद्धाच्या कालाची मात्र सुतराम् नाहीं. ”

या सर्व लेखनाचा आशय असा कीं, आधुनिक द्वारका गुप्तकालीन विष्णुमंदिराचे आसपास समजली जाऊं लागली. वास्तविक द्वारका ( कृष्णकालीन ) गिरनारच्या पायथ्याशीं म्हणजे सध्याचें जुनागड या जागीं वा आसपास निश्चित असावी.

आधुनिक पुरातत्त्वविद् यांवर प्रकाश टाकण्याचें श्रेय घेतील कां ?

---










अनुक्रमणिका








# भारताच्या स्वातंत्र्याचा प्रणेता !

मराठा तितुका मेळवावा
महाराष्ट्र धर्म वाढवावा

प्रकाशन संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई.

अनुक्रमणिका